## ।। अथ श्रीमुद्गलपुराणे अष्टमः खंडः प्रारभ्यते ।।

ॐ श्रीगणेशाय नमः । शौनक म्हणे सूतासी । विघ्नराजचरित्र तूं आम्हांसी । सांगितलें ममत्वनाशकर जें सर्वांसी । सर्वप्रद महामते ।।१।। तूं धन्य ज्ञानयुक्त । व्यासतुल्य अससी निश्चित । अथवा व्यासाहूनही अधिक श्रेष्ठ । शिष्य तूं त्या महात्म्याचा ।।२।। हें कथामृत जों जों ऐकत । तों तों अधिक तृष्णा मनांत । पूर्ण तृप्ति न आमुची होत । म्हणून पुनरपि कथा सांगा ।।३।। धूम्रवर्णाचें सुखप्रद चरित । सांग आम्हासी सांप्रत । सूत म्हणे शौनकाप्रत । सांगेन जैसें मी ऐकलें तें ।।४।। व्यास मुखांतून पावन । धूम्रवर्णाचें चरित महान । दक्षही विघ्नेशचरित्र ऐकून । मुद्गलासी विनवी विनयान्वित ।।५।। प्रणाम करून तयास म्हणत । ऐकिलें विघ्नेशमाहात्म्य अद्‌भुत । सर्वसिद्धिप्रद तरीही तृप्त । न जाहलें माझें मानस ।।६।। अमृताहूनही कथा मधुर । आतां धूम्रवर्ण चरित्र । माहात्म्यासह वर्णन कर । विस्तारानें मजप्रती ।।७।। त्यानें कोणास शमविलें । ह्याचें ब्रह्म कैसें वर्णिलें । कोणत्या योगें भावबलें । लाभतो भक्तांसी ।।८।। त्याचे किती अवतार । जाहले कोणतीं कृत्यें थोर । कैसें त्याचें तेज अपार । कोणी आराधिलें तयासी ।।९।। कोणास्तव देहधारी झाला । कोणत्या दैत्या वश करून घेतला। धर्मस्थापनेच्या कार्याला । प्रारंभ धूम्रवर्णानें ।।१०।। इत्यादि सर्व महिमान। योगींद्रा सांग जें पावन । ब्रह्मांडांत तुझ्यासमान । नसे अन्य ब्रह्मदायक सुपात्र ।।११।। सूत म्हणे शौनकाप्रत । ऐसें दक्ष प्रार्थी मुद्गलाप्रत । तेव्हां तो महायोगी भक्तियुक्त । म्हणे आनंद वाटूनिया ।।१२।। दक्षा तूं योगिवंद्य निश्चित । सर्व भावें मज वाटत । अन्यथा गणनाथाच्या कथेंत । रस तुजला न वाटता ।।१३।। धूम्रवर्णाचें

चरित सांप्रत । सांगेन संक्षेपानें तुजप्रत । जें सर्वसिद्धिप्रद जगांत । मोक्षप्रद परलोकीं ।।१४।। विस्तारानें सांगण्यास । शिवादि देवही करिती प्रयास । परी सामर्थ्य नसे तयांस । मीं तर स्वल्पज्ञानवान ।।१५।। येथ इतिहास पुरातन । शेष-शंकर संवादपर सांगेन । एकदां शेषनाग करी वंदन । शंकरासी आदरानें ।।१६।। तदनंतर तयासी म्हणत । तूं सिद्धिदाता पूर्ण सर्वज्ञ असत । करुणानिधे तुझ्याहून जगांत । अधिक श्रेष्ठ कोणी नसे ।।१७।। ऐसें वेदश्रुति प्रमाण । परी तूं स्वामी करिसी ध्यान । कोणाचें करिसी भजन । कोण हा शिवाहून परम श्रेष्ठ ।।१८।। हा संशय माझ्या चित्तांत । विचारीतसे सर्वभावें तुजप्रत । मज वाटे मोह होण्या आम्हांप्रत । ऐसें नवीन कर्म करिसी ।।१९।। मुद्गल सांगती दक्षाप्रत । ऐसा प्रश्न ऐकून शिव सांगत । होऊनी मनीं हर्षित । योगप्रिय भक्तांसी पाहूनियां ।।२०।। शेषनागाचा भावुक प्रश्न । कार्य त्याचें हें शोभन । याचा विचार करून । शिव सांगे तयासी ।।२१।। ऐसाचि एकदा एकांतांत । सनकादि भक्तोत्तम विचारित । प्रश्न मजला पडून भ्रांत । तुझ्यासम त्या समयीं ।।२२।। सनकादि तैं विचारिलें । महेश्वरा आम्हां ज्ञान झालें । तुझ्या रूपें परमतत्त्व भलें । तूं साक्षात ईश सर्वश्रेष्ठ ।।२३।। तुझा ईश न कोणी जगांत । मग कोणासी नियमें ध्यात । महादेवा मिथ्या मोहांत आम्हांस । पाडण्या कां ऐसें करिसी? ।।२४।। त्यांचें तें वचन ऐकून । काश्यपा शेषा मी आनंदून । त्यांना गणेशयोग कथन । केला पूर्ण शांतिदायक जो ।।२५।। ईशत्व अथवा अनीशत्व । हें मायायुक्त निःसंशय तत्त्व । ब्रह्मांत ब्रह्मभूत होता भेदभावत्त्व । कैसें राहील द्विजोत्तमा ।।२६।। ज्यानें मज ईशत्व दिलें । तैसेंचि अनीशत्व लोकांसी वाहिलें । त्या गणाधीशा मीं जाणिलें । भक्तिसंयुत द्विजांनो ।।२७।। अहंकारयुक्त जे वर्तती । ते गजाननासी न जाणती ।

त्या अहंकारा जिंकून निश्चिती । सेवितों त्याचे पदद्वय ।।२८।। शिवाचें ऐकून वचन । सनकादि मुनि विस्मितमन । भावसंयुक्त तैं होऊन । गणेशज्ञानीं लालस झाले ।।२९।। ते म्हणती महादेवासी । अभिमान जिंकण्या अशक्य सर्वांसी । देवादींस तैसें योगियांसी । अजिंक्य असे अभिमान ।।३०।। मीं नर मीं देव मीं आत्मा असत । मीं ब्रह्मा मीं महेश जगांत । ऐसा अहंकार प्रतिष्ठित । सर्व प्राणिमात्रांत ।।३१।। तरी कोणत्या योगानें जिंकिला । अहं जो बलवंत अजिंक्य जगाला । तें सर्व चरित्र आम्हांला । विस्तारपूर्वक सांगावें ।।३२।। श्रीशिव तेव्हां सांगत । अहं ब्रह्माऽस्मि मीं जाणत । मीं ब्रह्म या मंत्रासह जात । ब्रह्मांत मीं चित्तासह ।।३३।। महावाक्यमय योगसाधन । करितां ब्रह्म दिसे अंतर्धान । सारा अहं निरसून । ब्रह्ममय मन होय ।।३४।। बोधार्थ हें साधन । महावाक्य ख्यात जाण । त्याचा होतां बोध पावन । अहं आणि ब्रह्म भिन्न नुरेल ।।३५।। तेव्हां सनकादिक मुनिजन । विचारिती विनीत होऊन । नाथ दुर्गम तुमचें वचन । संशय आमुच्या मनीं असे ।।३६।। म्हणून सुलभ करून । सांगा महेश्वरा हा योग पावन । दया करून शिष्यांचें तारण । करावया सुशांतिप्रद ।।३७।। शिव तेव्हां इतिहास पुरातन । म्हणे मी तुम्हांस सांगेन । अहंभावाचें विनाशन । जें वृत्त ऐकतां सौख्यद होय ।।३८।। एकदा नक्षत्र ग्रहांचा नाथ । शरीरी जनांचा आत्मा पुनीत । ब्रह्मनाथ जो जगांत । त्यास राज्याभिषेक केला ।।३९।। तो ज्योतिष्पति जेव्हां होत । कर्मांचा राजा तैं वाटत । अहंकार त्याच्या मनांत । देवदेवपाच्या अत्यंत ।।४०।। ब्रह्मा कर्मांचा सृष्टिकर्ता । लोकपितामह तो ज्ञाता । विष्णू झाला पालनकर्ता । संहारक हर प्रख्यात ।।४१।। कर्मांच्या अन्य प्रभावें वर्तत । पोषणकर्ती शक्ति जगांत । कर्माधीन जग समस्त ।

ईश्वराधीन निःसंशय ।।४२।। परी भानुदेव अहंकारयुत । कर्मचालक स्वतःस मानित । म्हणे माझ्या अधीन जग समस्त । गर्व अत्यंत मानसीं ।।४३।। त्या घोर अहंकार वृतींत । असता त्यास शिंक येत । त्या शिंकेतून उत्पन्न होत । एक पुरुष सुंदराकृती ।।४४।। तो भूपृष्ठावरी पडला । परी भानूस न समजला । महाकाय विशालाक्ष विराजला । बळयुक्त तो पुरुष ।।४५।। तेथ शुक्राचार्य अकस्मात । सर्वार्थकोविद येत । तो हर्षभरें त्यांस पाहत । विचारी प्रेमानें त्यासी ।।४६।। कोण तूं कुठे तुझा निवास । काय करण्या इच्छिसी या समयास । मातापित्यांचें नाम आम्हांस । सांग काय इच्छा तुझी ।।४७।। तेव्हां तो पुरुष सांगत । मी सूर्याच्या शिंकेतून जन्मलों त्वरित । द्विजश्रेष्ठा मी सूर्याचा सुत । परी अनाथ या समयीं ।।४८।। मी या धरणीवरती परित्यक्त । तूं दिससी दयायुक्त । मज कुशल विचारिसी प्रेमयुत । तुझ्याच स्वाधीन मी होतों ।।४९।। मुनिसत्तमा माझें रक्षण । करावें तूं लालन पालन । श्रीशिव म्हणे तें वचन ऐकून । शुक्र योगिश्रेष्ठ म्हणे ।।५०।। त्याचें कर्म ध्यानानें पाहून । शुभ लक्षण त्याचें जाणून । शुक्र म्हणे तूं अहंभावसमुत्पन्न । सूर्यापासून निःसंशय ।।५१।। म्हणोनी अहं नांवानें ज्ञात । होशील तूं जगांत । तप करी आतां एकचित्त । षोडशाक्षर गणेशमंत्राचा ।।५२।। ऐसें सांगून विधियुक्त । गणेश मंत्र तो त्यास देत । नंतर शुक्र अंतर्हित । जाहला हर्षित होऊनियां ।।५३।। अहं सूर्यसुत तप करित । ध्याई गणपतीस हृदयांत । निराहार राहून जपत । मंत्र एकनिष्ठ अविरत तो ।।५४।। थंडी वारा पाऊस सहत । दृढनिश्चयें तप आचरित । इंद्रियें प्रयत्नें जिंकित । विघ्नपासी तोषविलें अन्तीं ।।५५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते

अहमुत्पत्तिवर्णनं नाम प्रथमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।
(अध्याय पहिला संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । श्रीशिव कथा पुढती सांगत । अहं मनोभावें तप आचरित । ऐशीं सहस्र वर्षे समाप्त । तेव्हां प्रसन्न गजानन ।।१।। त्याच्या भक्तिभावें संतुष्ट । प्रकटला वर देण्यास इष्ट । मूषकवाहन त्रिनेत्र वरिष्ठ । गजवक्त्र तैं महोदर ।।२।। चतुर्भुज पाशादींनीं सुशोभित। सिद्धिबुद्धियुक्त एकदन्त । शूर्पकर्ण देवमुनींसहित । गणसेवित सर्वप्रद ।।३।। त्यास पाहून अहं उठत । आदरें करांजली जोडित । सिद्धिबुद्धियुक्त पूजित । विघ्नेशास परमादरें ।।४।। तदनंतर क्रमानें नमन । करी देवांस मुनींस भावपूर्ण । दोन्ही कर भक्तीनें जोडून । स्तवन करी गणेशाचें ।।५।। गणनाथासी हेरंबासी । परात्म्यासी वरदात्यासी । वरदासी ब्रह्मनाथासी । निजास स्वरूपप्रदा नमन ।।६।। परत उत्थानासी सांख्यासी । ज्ञानांत बोधरूपासी । सोऽहं देहीं त्या बिंदुरूपासी । विघ्नेशासी नमन असो ।।७।। स्रष्ट्यांत ब्रह्मदेवासी । पालकांत विष्णुदेवरूपासी । संहर्त्यांत शिवशंकरासी । एकदंतासी नमन असो ।।८।। प्रकाशकांत सूर्यासी । मोहकांत शक्तिरूपासी । देवांत देवराजासी । विनायकासी नमन असो ।।९।। दाहकांत अग्नीसी। नीतिधारकांत यमासी । रक्षकांत नैर्ऋतासी । शूर्पकर्णासी नमन माझें ।।१०।। बलयुक्तांत वायूसी । निधिपतींत धनपासी । रुद्रांत कालरूपासी । लंबोदरासी नमन असो ।।११।। प्रजापतींत दक्षासी । नागेशांत शेषरूपासी । अनंत विश्वासी धूम्रवर्णासी । नमन माझें पुन:पुन्हां ।।१२।। ज्याच्या स्तवनीं वेद असमर्थ । योगीही मौन धरित । त्यास मीं अल्प मतियुक्त । किती स्तवूं तुज विघ्नेशा ।।१३।। धन्य

मी कृतकृत्य जगांत । सफल माझा जन्म निश्चित । धन्य मातापिता कुल समस्त । दर्शनें तुझ्या चरणांच्या ।।१४।। ऐसें स्तवून गणेशास नमित। गजानन अत्यंत हर्षित । अहं असुरा त्या म्हणत । महासुरा मीं प्रसन्न ।।१५।। तूं रचिलेलें हें स्तोत्र पावन । मजला अत्यंत प्रिय जाण । त्याच्या पाठक श्रोत्यांस धान्यधन । सर्व इच्छित लाभेल ।।१६।। पुत्रपौत्रादिक सुख लाभेल । भुक्तिमुक्ति सारें प्राप्त होईल । याचें पठणें बाणेल । चित्तांत भक्ति भ्रमनाशिनी ।।१७।। वर माग महाभागा मनेप्सित । देईन मीं तुझ्या स्तोत्रें तुष्ट । तपानें तुझ्या मी जित । सांग झडकरी हृद्गत तुझें ।।१८।। तेव्हां अहं गणेशासी प्रार्थित । प्रसन्न जरी माझ्यावरी सांप्रत । तुझी भक्ति माझ्या हृदयांत । सदैव दृढपणें विलसावी ।।१९।। जें जें मी इच्छित । तें तें होवो सफळ जगांत । सर्वदा मायाविकारें जे युक्त । त्यांच्या हस्तें मरण नसो ।।२०।। ब्रह्मांड गोलाचें राज्य द्यावें। सर्वभोगसंपन्न मज करावें । आरोग्य विजयादी मज लाभावें । अमोघ अस्त्र मज देई ।।२१।। ज्या अस्त्रानें संग्रामांत । अतुल्य मीं अजिंक्य विश्वांत । तुझ्या प्रसादें बळवंत । त्रिकाळांतही सर्व व्हावें ।।२२।। गणनायक तथाऽस्तु म्हणून । त्वरित पावला अंतर्धान। निजलोकीं करी गमन । अहं गेला शुक्राकडे ।।२३।। त्यांस प्रणाम करून । सांगे सकल वर्तमान । मुनिवर तें ऐकून । अहं असुराची प्रशंसा करी ।।२४।। महामति शुक्र आमंत्रित । सर्व महा असुरांसी त्वरित । ते सर्वही जगांत। जमले शुक्र चरणांपाशीं ।।२५।। त्यांना हितप्रद वचन सांगत । अहं असुराचा वृत्तान्त । तेही ऐकून अति हर्षित। गरजले प्रणाम करोनियां ।।२६।। महायोग्या आज्ञा द्यावी । मनाची खूण सांगावी । जी करणे असेल ती निवेदावी । कामगिरी तव पददासांसी ।।२७।। त्यांचें तें वचन ऐकून । सर्वार्थकोविद काव्य बोले आनंदून।

अहं असुरास राजा करावें हें मन । माझें सांगे सांप्रत ।।२८।। असुर तत्क्षणीं संमति । आपुली शुक्रास देती । तेव्हां वेदनिष्ठ ब्राह्मण बोलाविती। पूजिती त्यांना आदरें ।।२९।। त्यांच्या हस्तें राज्यपदावर । अहं असुरासी बैसविती थोर । अभिषेक यथाशास्त्र सुंदर । दैत्याधीश तैं झाला ।।३०।। त्याचे पाच सुदृढ प्रधान । शंख वेदघ्नक काल पैशुन । पाचवा अधर्मकारक महान । सर्वही अत्यंत तेजस्वी ।।३१।। त्यांच्या सहाय्यें राज्य करित । अहं असुर बलवंत । त्याच्या राज्यीं निवासा येत । लोक नाना वर्णाश्रमांचे ।।३२।। विविध अधिकारपदांवरी । आसुर सुखलोलुप भारी । भोग भोगून हृदयांतरी । सुखावले ते सारे ।।३३।। तदनंतर प्रमादासुर अर्पित । ममता नाम कन्या अहं नृपाप्रत। रूपशालिनी ती युवती विवाहांत । दैत्येंद्र रमे तिच्या संगे ।।३४।। मायेनें होऊन मोहित । जाहला तो ममतावश आसक्त । दोन पुत्रांसी जन्म देत। योग्य वेळीं ममता राणी ।।३५।। ते महावीर तिचे सुत । गर्व श्रेष्ठ नामें ख्यात । ऐसा बहु काळ जात । तेव्हां प्रमादासुर म्हणे ।।३६।। अहं दैत्येंद्रा महावीरा सांप्रत । स्वस्थ कां तूं बैसलास शांत । जिंकावें देवादिकां समस्तां त्वरित । राजा होई ब्रह्मांडाचा ।।३७।। वरदानप्रभावें तूं भयमुक्त । अजिंक्य या समग्र विश्वांत । वरांचें साफल्य त्वरित । करावें भोग भोगूनियां ।।३८।। सासऱ्याचें ऐकून वचन । अहं असुर प्रतापवान । शुक्राचार्यांस बोलावून । पूजा करी मनोभावें ।।३९।। त्यांची आज्ञा घेऊन । अन्य दैत्यवीरां जमवून । त्यांच्या समवेत शोभला महान । शुक्र प्रधानांच्या संगे ।।४०।। तदनंतर तो दैत्यप्रभु आज्ञा देत। दिग्विजय करा वीर समस्त । त्याची आज्ञा मिळतां जात । युद्धसज्ज ते महादैत्य ।।४१।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते अहम्सुरराज्यप्राप्तिवर्णनं नाम

द्वितीयोऽध्याय: समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय दुसरा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । शिवशंकर कथा सांगती । महामुनी ती श्रवण करिती । अहं असुरेश माजला अती । स्वयं निघाला दिग्विजया ।।१।। रथावरी आरूढ झाला । पुत्रासह त्या वेळा । प्रधानासहित असुरसंघ चालला । नाना वर्णपर महाक्रूर ।।२।। काळासही भय वाटावें । ऐसें उग्ररूप त्यांचें जाणावें । नाना वाहनांतून चालावें । अहं असुरेन्द्रामागून ।।३।। चतुरंग सैन्यांत शोभत । दैत्य नायक बळवंत । पृथ्वी जिंकण्या इच्छित । शंखादी महावीरांसहित तेव्हां ।।४।। शंखादी महावीरांनी जिंकिले । पृथ्वीवरील नृप बंदी झाले । कांहीं जखमी कांहीं मेले । कांहीं आले शरण त्यांना ।।५।। जे शरण आले त्यास सांगती । करभार द्यावा आम्हांप्रती । आमचे सेवक होऊन जगतीं । राज्य करा आनंदानें ।।६।। ते समस्त असुर जिंकित । सप्तद्वीपवती पृथ्वी त्वरित । तदनंतर पाताळांत प्रवेशत । दैत्येंद्र नागमुख्या जिंकण्या ।।७।। परी शेषनाग अन्य नागांसहित । त्यांना आला शरण क्षणांत । जाणून वरदानप्रभाव मनांत । सामोपचार करी दैत्यांशी ।।८।। वार्षिक करभार स्वीकारून । शेष मनीं दुःखीं होऊन । स्वस्थळीं गेला नागेंद्र महान । परी दैत्य काय करिती ।।९।। त्याच्या राज्यांत स्थापिती । कांहीं असुरांसी निश्चिति । शेषनागावरी ते ठेविती । पहारा नित्य स्वबळानें ।।१०।। त्यानंतर दैत्येंद्रांसहित । शुक्राच्या मार्गदर्शनें युक्त । अहं असुर प्रतापवंत । स्वर्गलोकीं प्रवेशला ।।११।। तो महा तेजस्वी गर्वयुक्त । इंद्राकडे दूत पाठवित । दूत देवराजास नमून सांगत । निरोप अहं असुराचा ।।१२।। इंद्र तो ऐकून क्रोधयुक्त । देवमुख्यांसह भेटण्या

जात । अंगिरसासी त्वरित । सत्कार करी मुनि तयाचा ।।१३।। रागावून इंद्र सांगत । असुरांचें जयवृत्त । अहं असुर वरप्रभावें महाबळयुक्त। आज दूत त्याचा आला ।।१४।। तो मज निरोप सांगत । शरण यावें देवांसहित । इतुका झाला मदोन्मत । आता काय करावें? ।।१५।। आपण सर्वज्ञ देवपक्षांत । स्वामी म्हणून आलों तुजप्रत । तुझ्या आज्ञावश समस्त । सांगा आतां उपाय कांहीं ।।१६।। तेव्हां अंगिरस गुरु सांगत। अहं असुर गणेशवरें मत्त । यांत संशय काहीं नसत । जिंकील सर्वही ब्रह्मांड ।।१७।। म्हणून शरण जाणें न शोभन । जाऊया विधात्याकडे आपण । तो श्रेष्ठ सर्वभावें असून । करील हित तोचि आपुलें ।।१८।। तदनंतर सारे त्वरा करून । विधात्यासी भेटले जाऊन । इन्द्रासहित देव त्यास नमून । सांगती दैत्यज वृत्तान्त सारा ।।१९।। तो ऐकून खेदखिन्न। ब्रह्मा जाई त्यांस घेऊन । शंकराकडे त्वरा करून । प्रणाम करून सर्व सांगे ।।२०।। शंकरही नि:श्वास सोडित । ऐकून तो वृत्तान्त । त्या सर्वांसह त्वरित जात । विष्णूजवळी त्या समयीं ।।२१।। त्यांचें वचन ऐकत । तैं विष्णु क्रोधयुक्त । महेश्वरासी आश्वासन देत । पराक्रमपूर्ण वचन बोलें ।।२२।। मीं महादैत्या त्या असुरांसहित । मारीन रहा निश्चित । मायायुक्त अहं असुर असत । परी मज माया न बाधेल ।।२३।। ऐसें बोलून महादेवाप्रत । अन्य देवांसह महाभाग तेथ । दैत्य पौरुषाची वाट पहात । वैकुंठांतच राहिला ।।२४।। अहंकारासुरासी ज्ञात । जेव्हां हा सकल वृत्तान्त । तो प्रवेशला अमरावतींत । दैत्येंद्रांसह हर्षभरें ।।२५।। इंद्रासनीं तो विराजत । अप्सरा गण त्यास सेवित । गंधर्व त्याची स्तुति गात । शोभला अत्यंत वैभवें ।।२६।। तदनंतर देवपदांवरी स्थापित । असुरांसी तो स्वर्गांत । महान स्वर्ग भोगी समस्त । असुरांसह सासऱ्यासमवेत ।।२७।। तदनंतर तो महाबळवंत । दैत्यसंघ

घेऊन ब्रह्मलोकीं जात । तैं पाहून विधिहीन हर्षित । ब्रह्मासनावरी बसला ।।२८।। भोगिले विविध भोग परम । तदनंतर गेला कैलासीं अभिराम । तो लोक जिंकून सकाम । भानुलोक जिंकला शक्तिलोकही ।।२९।। तेथ विलास विविध भोगून । विकुंठविजयार्थ उद्यतमन । दूत पाठवी कालासम भयदर्शन । केशवाप्रती त्या समयीं ।।३०।। काळ नामक तो दूत । केशवासी जाऊन सांगत । मी अहं असुराचा दूत । समेट करण्या आलों असे ।।३१।। हा वैकुंठ लोक सोडून । देवांसहित जा त्वरा करून । जेथ इच्छी तुझें मन । अन्यथा तुज मीं मारीन ।।३२।। माझी सूचना जरी न संमत । तरी युद्ध करी मजसमवेत । काळाचें वचन ऐकून क्रोधयुक्त । केशव म्हणे तयासी ।।३३।। त्या दूतास जणू जाळित । विष्णूचे शब्द तेजयुक्त । श्रीविष्णू म्हणे जा सांग त्वरित । अरे मंदविक्रमा अहं असुरा ।।३४।। तूं काय मज सांगसी । मीच मारीन क्षणीं तुजसी । तैसेची दैत्यसेनेसी । जा दूता तूं तुज अभय ।।३५।। तुज खलाधमा न मारीन । दूतत्वाचा मान राखीन । सांग स्वामीस जाऊन । सोड आपुलें राज्यपद ।।३६।। तैं कालासुर दूत परतला । दैत्यसभेंत त्यानें निवेदिला । निरोप जनार्दनाचा आला । तो ऐकतां राग अनिवार ।।३७।। सारे दैत्यगण क्रोधयुक्त । अहंकारासुरासमवेत । युद्धार्थ झाले उद्युक्त । तेव्हां विचारी अहं तयांसी ।।३८।। दैत्यमुख्यांस हितावह वचन । बोले अहं असुर निश्चिंतमन । महाबलहो कां खिन्न । झालात तुम्हीं चिंतातुर ।।३९।। अमोघ अस्त्रांनी देईन । तुम्हांसी मी सुखसमाधान । ऐसें बोलून तत्क्षण । सज्ज केलें धनुष्य त्यानें ।।४०।। मनीं तो अत्यंत संतप्त । मंत्रून अग्निअस्त्र सोडित । तें दशदिशांत जाळित । वैकुंठावरी चाल करी ।।४१।। देव अत्यंत क्षोभयुक्त । वरुणास्त्र तेव्हां सोडित । परी तें अग्न्यस्त्र न शांत ।

प्रखर तेज तयाचें ।।४२।। म्हणोनि देवगण भयभीत । पळती होऊन अग्निपीडित । वैकुंठ सोडून ते जात । वरुणदेव तेव्हां काय करी ।।४३।। चंद्रासहित रणांगणांत । पर्जन्यवृष्टी तो करित । परी त्या पर्जन्यजलेंही न विझत । परमदारुण अस्त्राग्नी ।।४४।। वरुणही पळाला चंद्रासहित । तेव्हां शक्ति महास्त्र सोडित । वरुणात्मक तें वर्षत । जळधारा अकस्मात ।।४५।। परी जणूं घृतपूरित । तैशियापरी अग्नि प्रदीप्त । मायायुक्त तो दहन करित । अति प्रखर स्वतेजानें ।।४६।। तेव्हां होऊन संतप्त । शक्ति पळाली क्षणांत । क्रुद्ध होऊन सूर्य येत । त्या असुराशी लढावया ।।४७।। तोही स्ववीर्यसंयुक्त । वरुणास्त्र वेगें सोडित । परी त्याचाही दाह होत । दिवाकर म्हणोनी पळाला ।।४८।। तदनंतर शिव क्रोधसमन्वित । स्वयं रणक्षेत्रांत लढत । तोही होऊन अति पीडित । पळून गेला रक्षणार्थ ।।४९।। विष्णू नंतर अति खेदयुक्त । स्वयं दारुण शस्त्र सोडित । तथापि तो अग्नि न शमत । परम दारुण सर्व भयंकर ।।५०।। अतिदाह होऊन जनार्दन । करी तेथून पलायन । सर्व देवही भयग्रस्त मन । गिरीकंदरीं पळाले ।।५१।। गिरिगुहांत गुप्त राहती । कंदमुळें ते खाती । ऐसें त्यांचे दिवस जाती । परी असुरांस कळलें वर्तमान ।।५२।। तेव्हां ते आपापल्या शस्त्रांसहित । असुरवीरांच्या संगतींत । आग्नेय दिशेस जात । वैकुंठीं हर्षभरानें ते ।।५३।। तेथ राहून चित्तांत । अभिमानें तो मदोन्मत्त । माझ्याहून श्रेष्ठ कोणी नसत । ऐसा गर्व त्याचे मनीं ।।५४।। तदनंतर अहं असुर नेमित । आपले असुर अधिकारी सर्व जगांत । गर्वास शिवपदीं स्थापित । श्रेष्ठास स्थापिलें वैकुंठीं ।।५५।। आपुले पुत्र कैलास वैकुंठांत । नेमून अन्य जागांत । पिशुनास शक्तिलोकांत । वेदघ्नास नेमियले ।।५६।। प्रमादास ब्रह्म लोकांचा नाथ । शंखास इंद्रपद देत । कालास यमलोकीं नेमित ।

कमळास वरुणलोकीं ।।५७।। अधर्म धारकास कुबेरपदावर । स्थापून तो महा असुर । महाबळी परतला सत्वर । स्वनगराकडे तदा ।।५८।। तेथ राहून करी शासन । ब्रह्मांडाचें गर्वितमन । मनीं म्हणे माझ्यासमान । तेजस्वी ना कोणी असेल ।।५९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते अहमसुरब्रह्मांडजयो नाम तृतीयोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय तिसरा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । शिव कथा पुढती सांगती । अहं दैत्य माजला जगतीं । परस्त्रीलालस मूढमती । पकडिल्या त्यानें नागकन्या ।।१।। देवकन्या नरांच्या दुहिता । बलात्कारें त्या आणितां । सर्वदूषक भोगी नित्यनेमता । मद्यमांस उपभोगी ।।२।। गणेशासी विसरून । दुष्टात्मा पापकर्मपरायण । एकदां अधर्मकारी दैत्य बोले वचन । कर जोडून सभेंत ।।३।। दैत्येंद्रांनी तो प्रेरित । म्हणे महाभागा सर्व ब्रह्मांड जित । तूंच एक जगदीश तुजसम नसत । अन्य कोणीही या जगीं ।।४।। विष्णुमुख्य देव वनांत । राहिले सांप्रत भयभीत । सुर असुर शत्रू असत । वेद ऐसें सांगती ।।५।। हे देवेंद्र शस्त्रादींनीं न मरतील । म्हणून अमर नामें ख्यात सबल । वेदवादांत हें वचन आढळेंल । यज्ञाहुती देव भक्षिती ।।६।। त्यांसी मारण्याचा उपाय । यज्ञकर्मांचा करावा क्षय । त्यायोगें देवगण उपोषित होय । क्षुधापीडित सारे मरतील ।।७।। म्हणून कर्मांचें खंडन । करावें दैत्येशा सत्वर जाऊन । पूर्वींही त्रैलोक्यराज्य जिंकून । असुर प्रबल झाले होते ।।८।। परी पुढें अमर वधिती । कालप्रभावें त्यांसी फसविती । जरी कांहीं न्यून पाहती । त्याचा लाभ घेऊनिया ।।९।। छिद्रान्वेषी देव समस्त । आपणा मारतील कदाचित ।

त्यांच्या विनाशार्थ त्वरित । प्रयत्न करी अहंराजेशा ।।१०।। त्या अधर्मधारकाचें वचन । ऐकून अन्य असुर आनंदून । म्हणती हें शोभन वचन । महाराज आपण मान्य करावें ।।११।। शंखादि असुर प्रशंसिती । तेव्हां अहंकार म्हणे हर्षितमती । अधर्मकरा तूं सांप्रती । योग्य सल्ला दिलास ।।१२।। आतां दैत्यहो समस्त । जावें तुम्हीं जगांत । यज्ञादि कर्में करा खंडित । राजाज्ञा ही मी देतों ।।१३।। दैत्यसमूहासहित हर्षित । अधर्मकारी तेव्हां निघत । भूमीवरी कर्में खंडित । केलीं त्यानें सर्वत्र ।।१४।। त्यायोगें हाहा:कार माजला । वर्णाश्रमांचा बंध तुटला । देवालयें फोडिता झाला । गणेशमूर्ती क्षेत्रस्थानें ।।१५।। सर्वत्र अहं असुरमय प्रतिमा । स्थापिल्या दैत्यनयनाभिरामा । ब्राह्मणांची करून मानखंडना । त्यांच्या हस्तें पूजविती ।।१६।। कर्मांचा प्रचार । सर्वत्र करविला अनिवार । ऐसा कर्मांचा संहार । करून भेटला असुरेश्वरासी ।।१७।। त्यासी स्वपराक्रम सांगत । असुरेंद्र त्याचा सन्मान करित । त्यायोगें मानी कृतार्थ । आपणासी अधर्मासुर ।।१८।। कर्मनाश होतां वर्णसंकर होत । जन सर्व झाले दुःखयुक्त । मुनींसहित सर्व देवांप्रत । उपोषण संकट ओढवलें ।।१९।। दैत्यनाशार्थ विचार करिती । ब्रह्मा अती खेदयुक्त सांगती । महेशादि देव मुनिगणांप्रति । मायायुक्त आम्हीं सारे ।।२०।। त्या दुरात्म्यानें आम्हांस जिंकिलें । अहं असुरें निष्प्रभाव केलें । नानाविध मायेचे झालें । प्रभुत्व सर्वत्र प्रस्थापित ।।२१।। त्या मायेच्या अतीत असत । गणेश एकला जगांत । पंचचित्तमयी बुद्धि वर्तत । सिद्धी पंचभ्रांतिकरी ।।२२।। त्यांचा गणनायक पति । मायिक हा सिद्धिबुद्धींचा पती । त्यांना मायेची न भीती। विघ्नेश्वर सर्व श्रेष्ठ देव ।।२३।। तोचि ह्या दैत्याचें करील हनन । परी दैत्यास त्याचेंच वरदान । सांप्रत विसरला त्यास म्हणून । हितकारक

हें आपणांसी ।।२४।। गणेशाचा मंत्र त्यागून । भोगविलासीं झाला निमग्न । गणेशक्षेत्रांचें भंजन । केलें असे त्या दुर्मतीनें ।।२५।। गणेशपूजन सर्व कर्मांत । करावें सर्वांनी विशेषयुक्त । परी तो अहं असुर मदोन्मत्त । विसरला त्या विघ्नेश्वरा ।।२६।। म्हणून आपण समस्त । पूजूया ढुंढि भक्तियुक्त । तो त्या महाअसुरासी मारील निश्चित। उपासना सारे करूंया ।।२७।। एकाक्षर मंत्राचा जप करूंया । गजानना हृदयीं ध्याऊंया । ऐशा विधीनें तोषवूया । गणेशप्रभूला आपण सारे ।।२८।। श्रीशिव कथा सांगत । ब्रह्म्याचें वचन ऐकत । देव सारे अभिनंदन करित । वाहवा उत्तम हा उपाय ।।२९।। ऐसें म्हणून ईश्वरासहित । निराहार ते व्रत आचरित । एकाक्षर विधानें भक्तियुक्त । गणेश्वरासी तोषविती ।।३०।। ऐसी शंभर वर्षे जाती । तेव्हां गणनायक प्रसन्न होती । त्या देव मुनीजनांपुढती । प्रकटले वर देण्यासी ।।३१।। मूषकावरी आरूढ असत । द्विरदानन ऐसा पाहत । तेव्हां देव मुनी त्वरित । हर्षभरें प्रणाम करिती सारे ।।३२।। आदरें पूजन करून । पुन: पुन: करिती वंदन । देव मुनिगण आनंदून । विघ्नेश्वराची स्तुती गाती ।।३३।। देवर्षी स्तोत्र गाती । धूम्रवर्णासी आमुची प्रणती । सर्वांसी सर्वदा सुखप्राप्ती । कृपाबळें जो देत असे ।।३४।। गणेशासि परेशासी । परात्परासी लंबोदरासी । विघ्नपतीसी विघ्नकर्त्यासी । विघ्नहारकासी नमन असो ।।३५।। हेरंबासी अनादीसी । विशेषें ज्येष्ठराजासी । सर्वपूजिता मनोवाणीविहीनासी । मनोवाणीमया नमन ।।३६।। ब्रह्मरूपासी ब्रह्म प्रकाशकासी । ब्रह्मपतीसी मंत्रनाथासी । महारूपासी देवासी । देवदेवेशरूपा नमन तुला ।।३७।। देवांसी वरदात्यासी । महोदरासी आदिपूज्यासी । सर्वांच्या मातापित्यासी । सर्वरूपासी नमन असो ।।३८।। सर्वात्म्यासी कर्मरूपासी । शूर्पकर्णासी

शूरासी । वीरासी परमात्म्यासी । चतुर्भुजासी नमन असो ।।३९।। गुणेशासी धूम्रासी । गुणेशासी कर्त्यासी । हर्त्यासी तैसें भर्त्यासी । परज्ञानस्वरूपा नमन तुला ।।४०।। स्वाधीनासी महामोहदात्यासी । सर्वहर्त्यासी गजाननासी । वेदादींसही वर्णन करण्यासी । शक्ति नसे दयाळा ।।४१।। तेही जेथ धरिती मौन । तेथ आम्ही काय करूं स्तवन । जेथ वर्ण धूम्राधिष्ठित होऊन । अव्यक्तरूपा तुझ्यांत ।।४२।। धूम्रवर्ण ऐसी ख्याती । वेदान्त तुझी सर्वत्र जगतीं । धन्य आम्हीं सारे जगतीं । पाहिलीं तुझीं पदकमलें ।।४३।। अव्यक्त असुनी व्यक्त । झालास भक्तांस्तव सांप्रत । ऐसें स्तवन करून वंदित । मुनिदेव सारे धूम्रवर्णासी ।।४४।। त्या प्रणतांसी उठवून । धूम्रवर्ण मेघगंभीर वचन । म्हणे तुमचें हें स्तोत्र महान । सर्व सिद्धिप्रदायक ।।४५।। जो हें स्तोत्र वाचील । अथवा भक्तिभावें ऐकेल । त्यास पुत्रपौत्रादिक लाभेल । ऐहिक इष्ट सर्वस्व ।।४६।। जें जें इच्छील तें तें समस्त । स्तोत्रप्रभावें होईल प्राप्त । वर मागा सुरर्षिजनहो सांप्रत । देईन मी तपतुष्ट ।।४७।। गणेशाचें ऐकून वचन । देवर्षी करिती वंदन । अत्यंत हर्षित होऊन । म्हणती त्या देवदेवेशासी ।।४८।। जरी गजानना तूं प्रसन्न । वर देण्या प्रकटलास तोषून । तरी अहं दैत्याचें करी हनन । सर्वज्ञा हें वरदान द्या ।।४९।। तो सर्वांसी दुःख देत । कर्मखंडनी नित्य आसक्त । त्याच्या मरणें जगांत । सुख शांति नांदेल निश्चयें ।।५०।। तूं देवा मायाविहीन । तुझ्या हस्तें त्याचें हनन । होईल यांत संदेह न म्हणून । मारावें अहं असुरा त्वरित ।।५१।। तूंच त्या असुरास । अभय पूर्वी दिलेंस । त्यायोगें सर्व जगास । अजिंक्य तो महा असुर झाला ।।५२।। आम्ही सर्वही पराजित । शरण तुजला आलों विनत । आतां रक्षण करी कृपायुक्त । दृढभक्ति दे तव चरणीं ।।५३।। अव्यभिचारिणी भक्ती । देई देवा

आम्हांसी पवित्र मती । तरी विघ्नविहीनता निश्चिती । लाभून तव पदाचा लाभ होवो ।।५४।। ऐसें बोलून वंदन । गणेशास करिती देव मुनिजन । तथास्तु म्हणून अंतर्धान । पावला विघ्नराज धूम्रवर्ण ।।५५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्‌गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते देवमुनिवरप्रदानं नाम चतुर्थोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय चवथा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । श्रीशिव म्हणती देवसत्तम । गणेशाचें ऐकून अभिवचन मनोरम । मुनींसहित हर्षोत्फुल्ल होऊन । मानिती असुरनाश जवळ असे ।।१।। योग्य काळाची वाट पाहत । विघ्नपासी ते भजत । गाणपत्यप्रिय ते जगांत । मोदयुक्त भक्तिपूर्ण ।।२।। धूम्रवर्ण त्यानंतर साक्षात । एके दिनीं दैत्यनाथाच्या स्वप्नांत । सर्वभावें भयंकर रूप दावित । दैत्यनाथ तैं घाबरला ।।३।। तो शोकमग्न प्रभातीं उठत । महा असुरांसी बोलवित । आपुलें स्वप्न त्यांसी सांगत । मनीं व्यग्र होऊनियां ।।४।। शंखमुख्यानो ऐका सांप्रत । स्वप्न पाहिलें मी भयंकर अत्यंत । धूम्रवर्ण गणेश क्रोधयुक्त । प्रकटला माझ्या पुढ्यांत ।।५।। त्याच्या क्रोधांतून उत्पन्न । जाहला भीषण अग्नि पावन । त्यानें केलें सर्व नगर दहन । शस्त्रास्त्रें आपली कुंठित झालीं ।।६।। मज पराक्रमविहीन । केलें त्यानें तत्क्षण । देवांसी त्यांचीं स्थानें देऊन । मुनिगणांसी अभय दिलें ।।७।। या स्वप्नाचा परिणाम त्वरित । आपुलें अशुभ वर्तवित । म्हणोनि सर्वही यत्नयुक्त । दैत्यनायकहो सज्ज व्हावें ।।८।। त्याचें तें खेदयुक्त वचन । ऐकून दैत्यनायक करिती सांत्वन । हितकारक भाव प्रसन्न । प्रकटवून म्हणती त्यासी ।।९।। दैत्येंद्र म्हणती

राजेंद्रा भय नसावें । अशुभ तुम्हांसी कैसें व्हावें । गणेशाच्या वरदानप्रभावें । निर्भय आपण असुरेश्वरा ।।१०।। ऐसी स्वप्नें जनांसी पडती । यांत संशय नसे निश्चितीं । परी जागेपणीं तीं ठरतीं । निष्फळ हें सर्वश्रुत ।।११।। त्या स्वप्नांचें असत्यत्व ज्ञात । असे सर्वांसी सतत । तरी ह्या स्वप्नाचें भय चित्तांत । आपण का धरिलें असे? ।।१२।। स्वप्नांत धनादिक लाभत । अथवा कोणाचा मृत्यु होत । तरी जागेपणीं तें सारें होत । सत्य कधीं कां सांगावें ।।१३।। ऐशापरी समाश्वासिती । असुरेश्वरासी उत्साह देती । वार्तालाप हसून करिती । स्वप्नभीती दूर कराया ।।१४।। तदनंतर विप्रेंदांनो ऐकावें । विघ्नपाचें चरित्र बरवें । असुर जाती खिन्नभावें । आपापल्या सदनासी ।।१५।। दुसरे दिनीं धूम्रवर्ण बळवंत । दैत्य नगरीजवळीं प्रकटत । पांच योजनें दूर संस्थित । नारद मुनी तेथ आले ।।१६।। त्या गणेश्वरातें पाहून । देवासी करी नारद वंदन । स्तुतिगान हर्षभरें गाऊन । हर्षगद्गद झाला ।।१७।। आनंदाश्रू त्याच्या लोचनांतून । ओघळले ते पाहून । गणाधीश म्हणे तयास वचन । दैत्यमंदिरीं तूं जाई ।।१८।। माझ्या आज्ञेवरून । त्या अहं असुरा सांग जाऊन । सामयुक्त कांहीं वचन । म्हणावें सुबुद्धीचा मार्ग धरी ।।१९।। देव राहतील स्वर्गांत । मानव पृथ्वीतळावरी सुखांत । नागादींचें असुरांचें राज्य अव्याहत । राहो सदा पाताळीं ।।२०।। आपल्या असुर नगरांत । महादैत्यांच्या समवेत । राज्य करी तूं आनंदांत । अन्यथा युद्धार्थ सज्ज व्हावें ।।२१।। नारद त्याचें वचन मानित । अहंकारासुराजवळी जात । त्यास संदेश कथन करित । ऐकून कोपला असुरेश ।।२२।। तो मदोन्मत्त उग्र प्रत्युतर । सांग नारदा जाऊन सत्वर । विघ्नेश्वरास त्या माझें । देवांसह ठार करीन तुला ।।२३।। तुझ्या आज्ञावश जगांत । कधींही मी न होणार निश्चित । नारद गणनाथास जाऊन सांगत । असुरेशाचें

तें वचन ।।२४।। नारदाचें वचन ऐकून । क्रोधयुक्त जाहला गजानन । अहं असुरा मारण्या तत्क्षण । शस्त्र धरी स्वकरांत तो ।।२५।। तदनंतर नारद हर्षभरित । प्रणाम करून त्यास जात । तो देवांस सांगे वृत्तान्त । धूम्रवर्णाकडे ते जाती ।।२६।। मुनींसहित ते शस्त्रयुक्त । स्तवन करून बोलत । आज्ञा करी आम्हांप्रत । धूम्रवर्णा महाभागा ।।२७।। त्यांचें वचन ऐकून । धूम्रवर्ण बोले प्रतापवान । स्वभक्तांना त्या प्रेमेंकरून । देव देवेशहो आतां पहावे ।।२८।। आश्चर्यकारक माझें कार्य सांप्रत । त्या महादैत्या मारीन त्वरित । शासनाचें उल्लंघन करित । असा कोण जगीं वाचेल ।।२९।। तुम्हीं कांहीं करूं नका । केवळ आश्चर्यवार्ता आतां ऐका । ऐसें बोलून देवादिकां । भयंकर पाश सोडिला त्यानें ।।३०।। तें गणेशाचें शस्त्र महान । अनंतरूप घेई क्रोधून । जेथ तेथ असुरांस पकडून । कंठ त्यांचा पकडिला ।।३१।। त्या पाशाने गळा आवळला । दैत्यगण पंचत्व पावला । हाहा:कार सर्वत्र माजला । नगरांत तेव्हां भयंकर ।।३२।। कांहीं दैत्य त्या महादैत्यास । जाऊन सांगती वृत्तान्त खास । महाराजा येथ काय बैसलास । रणी दैत्य बहुत मेले ।।३३।। धूम्रवर्णाच्या पाशांनीं । त्यांचा गळा पकडूनी । त्यांना धाडिलें यमसदनीं । दु:खयुक्त हा वृत्तान्त ।।३४।। तेव्हां अहं असुर भयग्रस्त । म्हणे सचिवांसी पीडित । काळमुखीं पडले दैत्य बहुत । स्वप्न सत्य झालें तें ।।३५।। दैत्येशांनो विपरीत । काळ पातला वाटे सांप्रत । तें खिन्न वचन ऐकून म्हणत । गर्व श्रेष्ठ सुत त्याचे ।।३६।। ताता महाभागा शोकमग्न । कां झालांत आपण । मायायुक्त धूम्रवर्ण । काय करील अप्रिय तुमचें? ।।३७।। देहधारी तो देवपक्षपाती । त्याची काय धरता भीती । त्यासी मारूं आम्हीं निश्चिती । पहा पौरुष आमुचें ।।३८।। ऐसें बोलून ते दोघे असुर सुत । गर्व आणि श्रेष्ठ जात । युद्ध करण्यास

त्वरित । प्रधानांदिकां समवेत ।।३९।। ते शस्त्रवृष्टि घोर करिती । पाशतेजें परी जळून जाती । तेव्हां प्रधानादी भयभीत अती । पळून गेले दशदिशांत ।।४०।। पाश तेजानें दग्ध होऊन । प्रधान जातां पळून । असुरपुत्र ते दोघे जण । पाश तोडण्या सरसावले ।।४१।। खड्गधारी पुढें जात । जरी पाशतेजें दग्ध होत । पाश हातांत पकडित । महावीर्यवन्त दोघे ।।४२।। त्या पाशानें आवळिले । त्यांचे श्वास रुद्ध झाले । घुसमटून संग्रामीं पडले । महर्षीनो त्या वेळीं ।।४३।। तदनंतर हाहा:रव माजून । दैत्य सारे भयग्रस्तमन । दशदिशांत गेले पळून । कांहीं परतले राजसदनीं ।।४४।। अहंकारास ते सांगती । रणांगणीं मिळाली वीरगती । पुत्रांस तुमच्या सांप्रती । दु:खपूर्ण वृत्तान्त हा ।।४५।। त्यांचें वचन ऐकून । महा असुर पडला मूर्च्छा येऊन । सर्वांनी केला सावधान । शोक करी भयग्रस्त तैं ।।४६।। परी धैर्य धरून जात । युद्ध करण्या रणांत । अस्त्रें विविध तो सोडित । महा उज्वल पाश तोडण्या ।।४७।। परी पाशाच्या तेजानें दग्ध । झाली शस्त्रें विशद । तेव्हां भयभीत होऊन विद्ध । अहं विचार करी स्वमानसीं ।।४८।। माझें हें अमोघ अस्त्र झालें । निष्फळ पाशतेजें आगळे । आश्चर्य हें काय घडलें । विपरीत आज नकळे मज ।।४९।। म्हणोनि माघार घेत । शेष दैत्यांसवे परत जात । स्वगृहीं जाऊन स्वगुरूस आणवित । त्याचा सल्ला विचारिला ।।५०।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते अहंकारपराजयो नाम पंचमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय पांचवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । श्रीशिव सांगती कथा । अहं असुराची ती

व्यथा । शुक्राचार्य गुरूसी जाहला सांगता । वृत्तान्त सारा तो असुर ।।१।। स्वहितार्थ विचारित । स्वामी वरदान निष्फळ होत । अमोघ अस्त्रही न चालत । ऐसें कां होई तें सांगा ।।२।। देवपक्षाचा संरक्षणकर्ता । मायामय धूम्रवर्ण होतां । माझें अस्त्र निष्फल तत्त्वतां । कैसें झालें हा संशय असे ।।३।। शुक्र तेव्हां त्यास म्हणत । अहं असुरा तूं अज्ञानयुक्त । मूर्खभावें मायायुक्त । धूम्रवर्णासी मानिसी ।।४।। तूं न जाणसी गजानन । तो मायायुक्त हा आभास जाण । वस्तुत: मायाविहीन । योगाकार गणेश ।।५।। क्रुद्ध होतां तुज मारील । धूम्रवर्ण हा महाबळ । म्हणून गणेशासी शरण या वेळ । जावें दैत्यपा सत्वरी ।।६।। जैसी धूरामध्यें व्याप्त । वस्तू न दिसे लोकांत । तैसीच वस्तु न होत ज्ञात । गणेशरूपी शिवादींस ।।७।। वेदरूप वर्ण होत । धूम्रासम जगतांत । अज्ञानानें अव्यक्त वाटत । धूम्रवर्णक हा सहज ।।८।। स्वाधीन हा परमब्रह्म । दुर्धट असे उल्लंघन यमनियम । वरदान दिलें स्वेच्छया मनोरम । निष्फळ तें तो करूं शके ।।९।। तोचि हा धूम्रवर्णक । सहज तोषे पावक । अविनाशी ब्रह्मपावक । तेंच मस्तक गणेशाचें ।।१०।। नागरूप जग समस्त । देह त्याचा जाण निश्चित । धूम्रवर्ण त्यायोगें होत । देहधारी नि:संशय ।।११।। पंचचित्तमयी बुद्धि असत । दक्षिणांगी त्याच्या पुनीत । चित्तभ्रांतिकारी सिद्धि विराजत । वामांगी त्याच्या सर्वदा ।।१२।। यांचा स्वामी गणेशान । मायाद्वयांनी क्रीडा करी प्रसन्न । त्यास बाळा शरण जाऊन । हित आपुलें सौख्य मिळवी ।।१३।। स्वसंवेद्ययोगानें प्राप्त । होतें दर्शन त्याचें जगांत । योग्यांस ह्या गणनाथाचें सतत । स्वानंदपालक तो प्रभू ।।१४।। तुज महाराजा यश न मिळेल । सुरअसुरमय ढुंढी सबळ । त्यास शरण जाई विमल । त्यातच तुझें हित असे ।।१५।। त्यानेंच देवांस स्वर्गांत । स्थापिलें मानवांसी भूतलावरी सुस्थित ।

असुरांस ठेविलें विवरांत । त्रिविध कर्म धर्मसंयुत ।।१६।। जेव्हां स्वधर्म त्यागित । सुरासुर होऊन लोभयुक्त । तेव्हां हा विघ्नराज प्रकटत । शासन करण्या तयांचें ।।१७।। देवांनीं जाऊन पाताळांत । जेव्हां दैत्यांस जिंकिलें इतिहासांत । तेव्हां तुज निर्मून करित । विघ्न उपस्थित देवांपुढें ।।१८।। आतां धर्मलोपे तूं झालास । वर्णाश्रम पराङ्मुख या समयास । उत्सुक अत्यंत देवनाशास । खलोत्तमा अहं असुरा ।।१९।। म्हणून तुज मारण्या गजानन । अवतरला धर्मसंस्थापक महान । जरी पाळिसी स्वधर्म एकमन । तरी तुज तो न मारील ।।२०।। त्रिविध त्रिविध भावांत । जेव्हां होते धर्म संस्थित । तेव्हां हा बुद्धिनाथ स्थित । नित्य ऐसें जाणावें ।।२१।। म्हणून गणेशासी शरण । जावें दैत्यपा हें जाणून । ब्रह्माकार सर्वत्र महान । सुरासुरांचा प्रवर्तक ।।२२।। श्रीशिव कथानक पुढें सांगती । शुक्राचें वचन ऐके हर्षितमति । अहं असुर संशय पुढतीं । मांडून म्हणे शुक्राचार्या ।।२३।। धूम्रवर्णासी शरण जाईन । गुरो तुमची आज्ञा पाळून । सुरासुरमयास त्यास प्रसन्न । परी संशय मनींचा दूर करी ।।२४।। सिद्धिबुद्धिसम माया नसत । प्रकृतियुक्त नित्य खेळत । गणेश तो सर्वपूज्य सर्वादींत । ब्रह्मनायक सर्व संमत ।।२५।। श्रीशब्दाने तो युक्त । कैसा तो मुख्य झाला जगांत । सिद्धिबुद्धींस सोडून स्वीकारित । श्री अथवा ॐकारासी ।।२६।। अन्य सर्व विप्रा होत । प्रकृतिसम श्रीनें युक्त । ऐसें शास्त्रांत वर्णित । हें काय आश्चर्य तें सांगा ।।२७।। म्हणोनि श्रीसम देवी जगांत । अन्य कोणी नसे निश्चित । ती सर्वत्र वेदांत । विलसते ओंकारात्मिका सदा ।।२८।। अहं असुराचा प्रश्न ऐकत । शुक्र तेव्हां त्यास सांगत । गकार सिद्धिरूप असत । णकार बुद्धिवाचक असे ।।२९।। त्यांचा स्वामी गणेशान । योगाकार तो महान । मायायुत ब्रह्म असून । मायेहून

तें भिन्न नसे ।।३०।। माया तीच सदा ब्रह्म । ब्रह्म तें माया अनुपम । तैसी सिद्धिबुद्धि मनोरम । गणेशचि असे दैत्यनायका ।।३१।। एकरूप तो असत । ह्यांत संदेह कांहीं नसत । म्हणून त्यास 'योग' म्हणत। विचक्षणा विचार करी ।।३२।। सिद्धिबुद्धि गणेशान । ऐसें हें त्रिविध ज्ञान । योगमय विलसे पावन । ऐसें रहस्य जाणावें ।।३३।। म्हणून सिद्धिबुद्धींची उपासना । गणेशाहून भिन्न असेना । म्हणून त्रिविध नसे ती अभिन्न । त्रिविध पूजन गणेशपूजनें ।।३४।। प्रकृति पुरुषाकार न दिसत । वामांग प्रकृतिकार वर्तत । दक्षिणांग पुरुष असत । त्यायोगें सिद्धिबुद्धियुक्त गणेश ।।३५।। सर्वांच्या वामभागीं प्रकृति संस्थित । गणेशाच्या उभयांगीं विराजत । एकरूपधरा माया ख्यात । सिद्धिबुद्धिमयी परा ।।३६।। भिन्नभोगार्थ आनंदयुक्त । सृष्टिरचण्या ती वांछित । सिद्धीच्या अंगापासून जन्मत । सर्वशोभायुक्त श्री ।।३७।। बुद्धीच्या अंगांतून उत्पन्न । ओंकार प्रकृति महान । त्यांनी आचरिलें घोर तप प्रसन्न । स्वस्वज्ञान प्राप्तीसाठीं ।।३८।। जो कोणी प्रभू सर्वोत्तम जगांत । त्यास प्रणाम ते करित । स्वमूलक मंत्र जपत । तेव्हां पाहती स्वहृदयीं तीं ।।३९।। मायाप्रचालक ब्रह्म प्रसन्न । स्वरूपमय तें पाहून । गणेशाचा एकाक्षर मंत्र पाहून । तेजोरूप तैं सुखावलें ।।४०।। हृदयांत आपुल्या तेजयुक्त । सुखप्रद तो मंत्र पाहत । त्याच मंत्रे तोषवित । गणेशासी आदिमाये तेव्हां ।।४१।। दिव्य सहस्र वर्षें जातीं । तेव्हां प्रसन्न झाला गणपती । वर देण्या तयांप्रती । सिद्धिबुद्धिसह आला ।।४२।। नरकुंजर रूप तें पाहत । तेव्हां ओंकारप्रकृति विस्मित । विचार करिती स्वहृदयांत । गणेशकृपेनें अद्भुत जाणलें ।।४३।। उग्र तपानें झालें ज्ञात । रहस्य त्या उभयतांप्रत । सिद्धिबुद्धियुक्त पाहत । सत्वर उठुनी वंदिती तैं ।।४४।। गणेशाचें स्तोत्र म्हणती । श्रीओंकार भक्तिभावें

चित्तीं । नमस्कार गणनाथासी करिती । सर्वसिद्धिप्रदा प्रेमें ।।४५।। सिद्धिबुद्धिपतीसी । स्वानंदपतीसी कर्तृरूपासी । अनाथांच्या सनाथासी । सर्वनाथासी नमन असो ।।४६।। परेशासी परपालकासी । आत्म्यांच्या अमृतासी । विघ्नेशासी लंबोदरासी । देवदेवेशरूपा नमन ।।४७।। देवांसी वरदात्यासी । गजाननासी ज्येष्ठराजासी । सर्वांच्या आदि पूज्यासी । अनामया ढुंढीस नमन असो ।।४८।। नित्यासी सर्वेशासी । ब्रह्मांसी ब्रह्मप्रदासी । ब्रह्मस्वरूपासी ब्रह्मणस्पतीसी । पूर्णयोगा तुज नमन असो ।।४९।। योगशांतिमयासी । चिंतामणि-स्वरूपासी । अनंतासी आदिरूपासी । अंत:स्थासी नमन असो ।।५०।। गणाधीशा योगशांतिधरा । किती स्तवन करूं उदारा । जेथ वेदादींसही आसरा । मौनाचा घ्यावा लागला ।।५१।। मनोवाणीमय मनोवाणीवर्जित । ऐसा उभय विरुद्ध गुणान्वित । प्रसन्न होई नाथा त्वरित । सर्वदा गणेशा आम्हांवरी ।।५२।। ऐसें स्तवन करून । गणाधीशास करिती वंदन । श्री ओंकारा, वरती उठून । विनम्र उभीं राहिलीं ।।५३।। त्यास श्री गणेश म्हणत । वर मागा जो मनीं वांछित । देईन उपासनें संतुष्ट । या स्तोत्रानें विशेषें ।।५४।। हें स्तोत्र सर्वसिद्धिप्रद । वाचका श्रोत्यास विशद । नित्य होय भुक्तिमुक्तिप्रद । ब्रह्मभूयकर सर्वदा ।।५५।। ओंकार यशानें युक्त । मजला प्रिय हें असत । पूर्ण भक्तिवर्धक निश्चित। ऐसें माझें वरदान ।।५६।। गणेशाचें ऐकून वचन । श्री ओंकारास विनीत वचन। भक्तियुक्त महान । गणेशभक्तवत्सला महामाया विनविती ।।५७।। देवा तुझी स्थिर भक्ती । योगशांतिप्रद दे चित्तीं । संकल्पसिद्धि सामर्थ्य जगतीं । पादपद्माचें तुझ्या दास्य ।।५८।। जैशा सिद्धिबुद्धि संमानित । केल्यास प्रभो तूं सतत । तैसेंच प्रियत्व आम्हांप्रत । गणनायका नाथा देई ।।५९।। जगद्ब्रह्म हें समस्त । करी आमुच्या वश सतत ।

तुझ्या प्रसादें सर्व मोहित । करण्यास बळ आम्हांस देई ।।६०।। तुझ्या भजनानेंच होवो नष्ट । मोह आमुच्या बळें जो निर्मित । अन्यथा नष्ट न पावो समस्त । शिवविष्णु देवांस मोह होवो ।।६१।। ते आमुच्यास्तव भ्रांत । सदा होवोत यत्नयुक्त । तेव्हां गणेश त्यास म्हणत । तुमचें इच्छित सफल होवो ।।६२।। सुदुर्लभ वरही मी देत । तुम्ही मोहवाल हें जग समस्त । सिद्धिबुद्धिनीं विविध जगत । रचिलें ब्रह्म नानाविध ।।६३।। तेथ मीं झालों बिंबित । मोहयुक्त तें बिंब असत । नाना भावपरायण वर्तत । भक्ति माझी मोहहीन करी ।।६४।। तुम्हीं माझ्या बिंबांत । व्हाल सर्वदा सम्मीलित । त्यायोगें महामायांनो जगांत । बंध मोक्ष तुम्ही कराल ।।६५।। सिद्धिबुद्धियुक्त मीं सनातन । तेथ तुमची योग्यता न चालून । मोहही न प्रभावी ।।६६।। ऐसें बोलून अंतर्धान । पावले तेथें गजानन । त्या दोन्ही माया करिती ध्यान । तेथेंचि राहून दैत्यपा ।।६७।। तेव्हां त्यांच्या हृदयांत । गणेशाचें जें बिंब पडत । त्यानें युक्त त्या सृजित। चतुर्धा हें भेदपर ।।६८।। बाह्य सौख्यकारक असत । माया चार जगतांप्रत । ब्रह्मांची दोन रूपें विख्यात । श्री ओंकार या विधी ।।६९।। चार जगांची ब्रह्मांची । ज्ञानरूपिणी ती साची । ओंकारात्मक माया गणेशाची । सर्वत्र असे संस्थित ।।७०।। त्यांचा युक्त गणेशान । क्रीडा विविध करी प्रसन्न । मोहयुक्त तैसा मोहविहीन। नाना भेद परायण ।।७१।। म्हणून सर्व जीवांत । महासुरा मोहयुक्त। मोहहीन आत्मभावांत। श्री ओंकार आदि संमत ।।७२।। आधीं प्रकृतीचा उच्चार। मग पुरुषाचा विचार । ऐसें करी विघ्नेश्वर । दैत्यनायका तुं जाणावें ।।७३।। गणेशाच्या नांवाचें पठन । श्री शब्दयुक्त म्हणती जन । तो ओंकारयुक्त जाण । माया द्वयाच्या खेळानें ।।७४।। वामांगी श्री असे धरिली । दक्षिणांगीं ओंकारा जागा दिली । बिंबरूपें हीं रूपें प्रकटलीं।

ब्रह्मरूपीं सर्वत्र ।।७५।। बिंब सर्वत्र भावांत । तदाकार तें होत । म्हणून शिवादी सर्व होत । ओंकार संयुत सर्वदा ।।७६।। जीव श्री ओंकारसंयुक्त । वेदवादी ऐसें सांगत । आदिमाये ऐसे ख्यात । बिंबाधारें विचार करी ।।७७।। म्हणून श्रीओंकार मोह सोडून । विघ्नेश्वराचें करी भजन । सिद्धिबुद्धियुक्त पूजून । नाना सौख्य पावशील ।।७८।। ऐसें हें धूम्रवर्णाचें चेष्टित । सांगितलें त्यास शरण सांप्रत । दैत्या शांतिदास जाई त्वरित । भुक्तिमुक्तिप्रदा भक्तीनें ।।७९।। भिन्नभावकर मायाद्वय वर्तत । श्रीओंकार नामें ख्यात । ब्रह्मभूयमयी ज्ञात । सिद्धिबुद्धि विचक्षणा ।।८०।। ऐसें हें सर्व रहस्य कथिलें । सर्वसंमत तुज भलें । वेदगुह्य जरी तुज पटलें । तरी अहं असुरा त्वरित जाई ।।८१।। सर्वसिद्धिप्राप्तीस्तव । शरण जाई त्यासी अपूर्व । लीन भाव ठेवूनी देव । प्रसन्न करून तूं घेई ।।८२।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते अहंकारासुरज्ञानोपदेशो नाम षष्ठोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सहांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । शिव सांगे पुढचा वृत्तान्त । शुक्राचा उपदेश अहंकार ऐकत । त्यास प्रणाम करून म्हणत । ज्ञानसंयुक्त कृतांजली ।।१।। गुरो आपण बोध दिला । तो मज मान्य झाला । शरण जाईन गजाननाला । सर्वशांतिप्रदायका त्या ।।२।। सुरासुरमया त्या ब्रह्मासी । ऐसें सांगून शुक्राचार्यासी । श्रीओंकारापासून मनासी । आकर्षून योगेशा शरण गेला ।।३।। महापाशास पुरप्रांतीं पाहत । त्यास कर जोडून नमन करित । शस्त्रराजाचें स्तवन करित । गणेशाहंकृतीचा धारक जो ।।४।। अहं गणेशपाशास स्तवित । शस्त्रराजासी त्या वंदित । मोक्षरूपास

बंधरूपा नमित । गणेशकराच्या भूषणासी ।।५।। मोहमायामय असे ख्यात । बंधप्रद सर्व जंतूप्रत । गणेशज्ञानानें जो नर युक्त । तो बंधहीन होईल ।।६।। तेंच बंधरूपाख्य असत । शस्त्र त्या महात्म्याचें विख्यात । तूं पाशरूप जगांत । बंधमोक्षकर महान ।।७।। जे तुज शरण येत । त्यांस नव बंधज भय नसत । शस्त्रा मीं तुज शरणागत । रक्षण करी तूं माझें ।।८।। तेजनाथासी दुष्टनाशकरासी । परमात्म्यासी पाशासी । शस्त्रब्रह्मासी मीं तुजसी । वंदितसें मनोभावें ।।९।। ऐसी स्तुति करून नमित । महापाशासी पुनरपि विनीत । अहंकार त्याचा निरोप घेत । विघ्नेश्वरा भेटण्या गेला ।।१०।। हें स्तोत्र जो वाचील । त्याचा बंध नष्ट होतो समूळ । मायापाशमय जो सबळ । गणेशांत गति लाभावी ।।११।। पाश जेव्हां निघून जात । तेव्हां अहंकार गुरूसहित । धूम्रवर्णास भेटण्या जात । पाहून त्यास प्रणाम करी ।।१२।। पुन: वरती उठून । विघ्नेशाचें करी पूजन । सर्वेशासी पुनरपि वंदून । कर जोडूनी स्तुती करी ।।१३।। धूम्रवर्णासी गणेशासी । परमात्म्यासी अव्यक्तासी । आदिबीजासी परेशासी । लंबोदरासी नमन असो ।।१४।। दैत्यनाथासी हेरंबासी । महेशासी पालकासी । कर्मासी कर्मरूपासी । नानाकर्मप्रचारका नमन ।।१५।। ज्ञानासी ज्ञानदात्यासी । ज्ञानाच्या ज्ञानासी चराचररूपासी । जंगमस्थासी स्थावरासी । स्थावर जंगमहीना नमन ।।१६।। योगासी योगनाथासी । योग्यासी योगदायकासी । योग्यांसी योगदात्यासी । चिंतामणीसी नमन असो ।।१७।। शांतासी शांतचित्तासी । शांत मूर्तीसी ब्रह्मपतीसी । सिद्धिबुद्धिदात्यासी ब्रह्मासी । सिद्धिनाथासी नमन असो ।।१८।। बुद्धीशासी सिद्धिबुद्धियोगासी । मूषकावरी आरूढासी । मूषकध्वजधारकासी । चतुर्भुजासी नमन असो ।।१९।। स्वानंदपतीसी माझें नमन । किती करूं मी तुझें स्तवन । गणाधीशा

तूं धूम्रवर्ण । वेदवेदासही अवर्णनीय ।।२०।। तुझें रूप अव्यक्त । वर्णन करितां वेद धूम्रायित । योगशांति तें धरित । कथन करण्या अक्षम ।।२१।। म्हणून धूम्रवर्ण तुज म्हणती । वेदवादी जन जगतीं । योगिदुर्लभा तुझें मजप्रती । दर्शन झालें धन्य मी ।।२२।। माझें सर्व कुळ धन्य । तुझ्या अंघ्रियुगाचें झालें दर्शन । ऐसें बोलून वाचे रम्य । भक्तियुक्त तो महासुर ।।२३।। भक्तिरसांत निमग्न । तयासी पाहे गजानन । प्रेमयुक्त म्हणे वचन । वर माग महाभागा ।।२४।। तुझ्या या स्तोत्रानें संतुष्ट । देईन तुझें सर्वही इष्ट । तूं रचिलेलें हें स्तोत्र । सर्व सिद्धिप्रद सुखद ।।२५।। ह्याचें करिता पठण । तैसेंचि प्रेमानें वाचन । त्यास अहंकारज भय नसून । भुक्तिमुक्ति लाभे दैत्येशा ।।२६।। जें जें इच्छील तें तें देईन । तो माझा प्रियभक्त जन । मोहविवर्जित सदा होऊन । तयांसी न्यून कांहीं नसे ।।२७।। ऐसें ऐकून गणेशवचन । तें ऐकून अहं बोले प्रसन्न । धूम्रवर्णासी प्रणिपात करून । महासुर त्या वेळीं ।।२८।। जरी मज वर देण्या आलास । धूम्रवर्णा गजानना तव भक्तीस । देई मज तूं दृढत्वास । स्नेह तुझ्या पादपद्मीं ।।२९।। मज गाणपत्य तूं करी । गाणपत्यप्रिय मजला तारी । माझें स्थान वृत्ति योगक्षेमकरी । सांगे दास मी विनम्र तुझा ।।३०।। अन्य कांहीं मीं न याचित । व्हावें श्रीओंकार मोहवर्जित । सिद्धिबुद्धियुक्ता भक्तियुत । तुज भजेन विशेषें ।।३१।। गुरूनें मज बोध अत्यन्त । केला तो मीं स्मरत । योगशांतिमयरूपा तुज सांप्रत । महोदरा मीं पूजीन सदा ।।३२।। धूम्रवर्ण तें ऐकून म्हणत । माझी दृढभक्ति तुझ्या हृदयांत । वसेल अहं असुरा सतत । गाणपत्यप्रिय तूं होशील ।।३३।। दास्यपरायण एकचित्त । माझा भक्त तूं होशील ख्यात । जेथ माझें पूजन कार्यादींत । न करिती तेथ स्थान तुझें ।।३४।। तैसें कर्मफळ खाऊन । त्या कार्याचें करी विध्वंसन । परी कार्यादींत

जेथ करिती स्मरण । तेथ पीडा देऊं नको ।।३५।। अहंकारा तुझा वारा । सात्त्विक जनांस न लागो उदारा । परी भ्रष्टस्वभावी असुरां । भ्रष्ट करी तूं निरंतर ।।३६।। आपुल्या नगरांत स्थित । राखी सदा माझे भक्त । त्यांसी माझ्या अहंकृतियुक्त । नित्य करावें आदरानें ।।३७।। जेथ कर्मादीत माझें स्मरण । तैसेंचि करिती पूजन। तेथ साधुस्वभावें वागून । अहंकृतिवर्ज्य जगांत करी ।।३८।। गणेशभक्तिसंयुक्त । माझ्या अभिमानें तूं युक्त । होशील यांत संदेह नसत । जाई आतां माझ्या आज्ञेनें ।।३९।। ऐसें बोलून गणाधीश थांबत। शिव सांगती पुढला वृत्तांत । अहंकार त्यांस वंदून जात । आपुल्या नगरासी मोदानें ।।४०।। त्याचें तें हृदय परिवर्तन । जाणून दैत्येश दु:खित मन । त्याचा संग सोडून । पाताळविवरीं निघून गेले ।।४१।। भयविव्हल ते होत । परी अहं असुर सुखयुक्त । त्या गणनायकासी भजत । अनन्यमनें धूम्रवर्णा ।।४२।। जैसें विघ्नेशें सांगितलें । तैसें आचरण ठेविलें । अंतीं शांतरूप प्राप्त झालें । अहंकार असुरासी ।।४३।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते अहंकारशांतिरूपवर्णनं नाम सप्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु।

(अध्याय सांतवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । शिव सांगे पुढील वृत्तान्त । अहं असुर जाहला शांत । तें पाहून देवऋषि विस्मित । तैसेचि मुदित सर्व जन ।।१।। ते धूम्रवर्णासी पूजिती । भक्ति दृढ त्यांच्या चित्तीं । पुन: पुन्हा प्रणाम करिती । स्तवन करिती कर जोडून ।।२।। देवर्षि धूम्रवर्णाचें स्तोत्र गाती । सर्वादि पूज्यासी वंदिती । निरालंबासी वंदन करिती । स्वरूपासी नित्य देवासी ।।३।। ढुंढीसी सदा अव्यक्त रूपासी । सर्वांतगासी

सर्वेश्वरासी। सदा मोहहीनासी मोहप्रदासी । धूम्रवर्णासी नमन असो ।।४।। निजभक्त मोहनाशकासी । महाआनंद त्रैविध भावयुक्तासी । परेशासी धूम्रवर्णासी। सर्वेश्वरासी नमन असो ।।५।। सिद्धिबुद्धिप्रदात्यासी । गणेशपुरांत वासकर्त्यासी । स्वसंवेद्यनामासी । अनाथनाथासी नमन असो ।।६।। सदा स्वेच्छेनें क्रीडाकरासी । सगुणासी निर्गुणासी । महा आखु ध्वजासी। धूम्रवर्णा सर्वेश्वरा नमन असो ।।७।। हेरंबकासी गजाकारतुंडासी । लंबोदरासी त्रिनेत्रधरासी । शूर्पकर्णासी क्षोभकारीसी । धूम्रवर्णा सर्वेश्वरा नमन असो ।।८।। मदासक्तयोगींद्रासी । भृंङ्गात्मकासी चतुर्बाहूसी एकदंतासी । विचित्र अनर्घ्य वस्तुभूषितासी। धूम्रवर्णा सर्वेश्वरा नमन असो ।।९।। देवदेवेशासी सुपुत्रासी । आद्य सृष्टिनिर्मात्यासी । मायिकां मोहप्रदासी । धूम्रवर्णा सर्वेश्वरा नमन असो ।।१०।। तूं प्रेरणा देतां निर्मित । अभेदात्मक जीवन भूमन् पुनीत । तेथ तदाकाररूपें तूं निवसत । धूम्रवर्णा सर्वेश्वरा नमन असो ।।११।। त्या आत्मरूपाने सृजिलें । तदनंतर भेदकांचें निज दैवत भलें । ब्रह्मभावें तुझेंच रूप जाहलें । धूम्रवर्णा सर्वेश्वरा नमन असो ।।१२।। असद्भाव युक्तें विदेह निर्माण । केलें जैं विदेह ब्रह्म पावन । सांख्यात्मक मूळ बीज तूंच शोभन । धूम्रवर्णा सर्वेश्वरा नमन असो ।।१३।। त्या विदेहानें सृजिलें । स्वतोत्थानरूप जें शोभलें । तुझ्या प्रबोधें विघ्नेंश्वर रूप झालें । धूम्रवर्णा सर्वेश्वरा नमन असो ।।१४।। तदनंतर तुझ्या सत्तेनें निर्मित । सदात्मस्वरूप सोहंरूप उदात्त। तूंच तेथ परात्म्या वसत । धूम्रवर्णा सर्वेश्वरा नमन असो ।।१५।। त्या सदैकस्वरूपानें निर्मिलें । महाबिंदुरूप चाराचें मूळ भलें । सहज योगानें तेथ विलसलें । रूप धूम्रवर्णा तुझें ।।१६।। तदनंतर नामरूप सम । सुषुप्तीत सुसूक्ष्म रूप जें परम । तैसेंचि स्थूलभाव संपन्नसम । चतुर्विध शरीरें तूं निर्मिली ।।१७।। तीं शरीरें

क्रीडापर । धूम्रवर्णा तूं सर्वेश्वर । विश्वरूप सर्वाकार । अनंत आननांनी युक्त तूं ।।१८।। चर स्थावररूपें भोग । भोगिसी तुंच सुभग । चराचर रूप सृष्टिकर्ता विश्वग । देवीमया तू प्रकाशवंत ।।१९।। देवयक्षा साध्या तुजसी । वंदन देवेंद्रा देवात्मकासी । दिगीशासी वृक्षादिबीजात्मकासी । धूम्रवर्णा सर्वेश्वरा तुज नमन ।।२०।। सर्परूपासी दैत्यात्मकासी । समुद्रादि नाना भेदरूपासी । अनंतरूपें क्रीडाकरासी । धूम्रवर्णा सर्वेश्वरा तुज नमन ।।२१।। ऐसें असोनी तदाकारहीन । सदा सहजयोग संपन्न । स्वसत्तात्मक तूं पावन । धूम्रवर्णा सर्वेश्वरा नमन असो ।।२२।। म्हणोनि वेदवाद धूम्र होती । धुरकट ह्यांची होत मती । तुझ्या स्वरूपवर्णनीं थकती । म्हणोनि तूं धूम्रवर्ण ।।२३।। वेद योगींद्र जेथें हरलें । तेथ आमुची मति काय चाले । आम्हीं अल्पबोधें स्तविले । धूम्रवर्णा सर्वेश्वरा नमन असो ।।२४।। श्रीशिव सांगती वृत्तान्त । ऐसें स्तुति स्तोत्र गाऊन वंदित । देव ऋषि वंदन करित । तयासी म्हणे धूम्रवर्ण ।।२५।। महाभागांनो मीं स्तुतितुष्ट । देईन तुमचें जें इष्ट । जरी दुर्लभ असलें दुर्घट । तरीही तें देईन ।।२६।। तुम्हीं रचिलेलें स्तोत्र उत्तम । सुसिद्धिप्रद इष्टकाम । ब्रह्मभूयकर मनोरम । होईल सर्वत्र सर्वदा ।।२७।। पुत्रपौत्रकलत्रादि प्राप्त । धनधान्य समृद्धि होत । आयुरारोग्य ऐश्वर्य लाभत । पाठका तैसे श्रोत्यासी ।।२८।। ह्या स्तोत्राचें वाचन । एकवीस वेळा करून । एकवीस दिवस नित्यनेम । मारण उच्चाटनें न बाधती ।।२९।। परकृत्यादिक सर्व नष्ट । होईल सर्व दूर अनिष्ट । या स्तोत्रमुख्यें स्तवितां इष्ट । पावतील भक्त सदा ।।३०।। हें वरदान ऐकून प्रार्थिती । ते देव ऋषि अतिप्रीती । अहं असुराची केलीत शांति । धूम्रवर्णा तेणें तुष्ट ।।३१।। त्यांतच आम्हांस वर लाभला । स्वाधिकार पुनः प्राप्त झाला । आतां वर्णाश्रम धर्मपालनाला । सामर्थ्य लाभेल जनांसी ।।३२।।

आणखी काय मागूं सांप्रत । तुझी दृढ भक्ति उपजो हृदयांत । अहंकाराचा जी नाश करित । त्या भक्तीनें तुष्ट व्हावें ।।३३।। तथाऽस्तु ऐसें बोलून। गणेश्वर पावला अन्तर्धान । तदनंतर त्यासी नमून । क्षेत्र तेथें स्थापिती ।।३४।। धूम्रवर्ण क्षेत्र तें ख्यात । तेथ गणेशासी ते पूजित । आपापल्या पदीं जात । हर्षभरें ते सारे ।।३५।। स्वकार्यांत सुखयुक्त । सदैव गणपतींत आसक्त । ऐसें हें अहंकारभयनाशक पुनीत । सांगितलें कथानक ।।३६।। ऐशापरी तो धूम्रवर्ण । नाना अवतार घेऊन । विश्वासी करी निर्विघ्न । भक्तिभावें तो प्रसन्न ।।३७।। धूम्रवर्णाचें अवतार अनन्त । ते वर्णनातीत असत । म्हणोनि संक्षेपें कथिलें वृत्त । मुख्य अवताराचें येथें ।।३८।। सनकादी मुनींनो सतत । गणेशासी भजा भावयुक्त । तेणें अहंकार-विनिर्मुक्त । योगिवंद्य शांतियुक्त तुम्हीं व्हाल ।।३९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते धूम्रवर्णावतारसमाप्तिर्नाम अष्टमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय आठवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । सनकादि श्रीशिवास म्हणती । कुरुक्षेत्राची ऐकिली ख्याती । महादेवा धूम्रवर्णाचें जगतीं । प्रमुख क्षेत्र तें सर्ववरद ।।१।। त्याचें माहात्म्य आम्हांसी । सांगावें संतोषप्रद जें जगासी । शिव सांगती तेव्हां त्यासी । अवर्णनीय त्याचा महिमा ।।२।। हिमाचल प्रांतीं ऐशान्य दिशेंत । धूम्रवर्णाचें हें क्षेत्र ख्यात । त्याचें माहात्म्य संक्षेपें सांप्रत । सांगतो ऐका एकचित्तें ।।३।। देवर्षीनीं केला स्थापन । धूम्रवर्ण शुंडादंडमुख श्रीमान् । चतुर्बाहुधारक त्रिनेत्र महान । एकदंत परशुधारी ।।४।। तेथ अहंकार असुर भजत ।

गणेशासी भक्तियुक्त । त्या गणेशाच्या वामांगीं विलसत । सिद्धि सर्वप्रियंकरी ।।५।। दक्षिणांगीं बुद्धि असत । मूषक शोभत त्याच्या पुढ्यांत । क्षेत्राचा विस्तार ज्ञात । दशयोजनें चतुरस्त्र ।।६।। धूम्रवर्णाच्या पुढ्यांत । मुद्गल मुख्य भक्त वर्तत । शुकादी भजती स्तुति गात । पाठीं पार्षद प्रमोदमोदकादी ।।७।। त्यांच्या हातांत शस्त्रें असतीं । ते धूम्रवर्णास सेविती । प्रयागादी तीर्थें वामांगीं वर्तती । काशी मुख्य क्षेत्रें त्यास भजती ।।८।। दक्षिणांगी अमरवर । शंभु विष्णु मुख्यादि सुरवर । शस्त्रांसहित सपरिवार । गणनायका नित्य भजती ।।९।। शेषादी नागराज पर्वत । हैममुख्य तेथ पूजित । गंधर्व चारणसिद्ध आराधित । वसु तैसे मनू तेथें ।।१०।। आदित्य रुद्र विद्याधर । अप्सरादी तेथ वसती थोर । द्विरदाननासी भक्तिपर । भजती या क्षेत्रांत सारे ।।११।। जें जें श्रेष्ठतम त्रिलोकांत । तें तें येथ असे स्थित । धूम्रवर्णाच्या सेवेंत रत । भक्तिभावें समन्वित सदा ।।१२।। त्याचीं स्थानें असंख्य असती । त्यांची अशक्य असे गणती । परी संक्षेपे मी तुम्हांप्रती । कथिलीं कांहीं महर्षींनो ।।१३।। येथ जे महासिद्धिप्रद । क्षेत्र असे पुनीत विशद । त्यांत स्नान करी विघ्नप सुखद । महत्त्वपूर्ण स्थान हें ।।१४।। येथ करितां स्नान । वांछित लाभून सर्व जन । अन्तीं मोक्षपदाचा सन्मान । त्यास लाभे निःसंदेह ।।१५।। विष्णुमुख्य देवगण । कश्यपादी महर्षी प्रसन्न । तेथ प्रहृष्ट होऊन । स्नान करिती नित्य नेमें ।।१६।। अन्य क्षेत्रस्थ नागादी येत । या क्षेत्रांत स्नान करित । अनेक जन निवास करित । येथ स्नानार्थ आनंदे ।।१७।। शिव विष्णु मुख्यांची असती । तीर्थे तेथ पवित्र अती । त्यांत स्नान करतां प्राप्ती । होते त्या त्या पदांची ।।१८।। तेथ धूम्रवर्णाचें घेतां दर्शन । ईप्सित लाभें धन्य जन । यात्रा करिती भक्त जन । लाभती धर्मार्थकाममोक्ष ।।१९।। भाद्रपद शुक्ल चतुर्थी दिनीं । धूम्रवर्ण

मूर्ति देवऋषीनीं । पूर्वीं स्थापिली माध्याह्नीं । म्हणोनि तिथि ही परम पावन ।।२०।। या तिथीस वार्षिक उत्सव । यात्रापर करिती सदैव । परस्परांस बोधभाव । सांगती ते गजाननाचा ।।२१।। शंकर महर्षी आदियुक्त । रोमांचांनी तेव्हां होत । गाणेश जे तेथ जात । तेही हर्षभरित होती ।।२२।। यात्रा पूर्ण करून जाती । ते सारे स्वस्थानाप्रती । धूम्रवर्णास मनीं स्मरती । भक्तिभावें सर्वदा ।।२३।। अंतीं स्वानंदलोकांत । ते सर्वही जाती निश्चित । शैव वैष्णवादी क्रममार्गें जात । स्वानंदलोकीं शेवटीं ।।२४।। जे या क्षेत्रांत पावती निधन । ते स्वानंद लोकीं जाऊन । ब्रह्म रूपक गाणप होऊन । सदैव सुखी निवसतात ।।२५।। धूम्रवर्णक्षेत्राचें महिमान । विस्तारें सांगण्या अशक्य म्हणून । कथिलें यथामति अल्प प्रमाण । मुनिसत्तमहो ऐकावें ।।२६।। जेवढीं गणेशक्षेत्रें ब्रह्मांडांत । ब्रह्मभूतमय असत । तीं तीं सारीं चतु:पदमय वर्तत । धर्मअर्थकाममोक्षपर ।।२७।। पाचवें जें ब्रह्माकार । क्षेत्र तें गणपतीचें थोर । ऐसें हें क्षेत्र उदार । माहात्म्ययुक्त धूम्रवर्णाचें ।।२८।। हें माहात्म्य जो ऐकत । अथवा स्वयं वाचीत । अन्यांस वाचून दाखवित । त्यास सर्वार्थ लाभेल ।।२९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते धूम्रमहिमावर्णनं नाम नवमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय नववा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । सनकादी पुन: विचारिती । धूम्रवर्णाचे अवतार नाना असतीं । त्यांतील प्रमुख कोणते जगती । तें आम्हांसी सांगावें ।।१।। धूम्रवर्णाचें चरित्र श्रवण । करितां न तृप्ति पावती श्रवण । अहंकारशामक जो पूर्ण । चरित्र श्रवणीं लालस त्याच्या ।।२।। श्रीशिव म्हणती

तयांप्रत । मुख्यांत मुख्य जे असत । त्यांचें सांगेन संक्षिप्त चरित्र । अन्यथा अशक्य वर्णायासी ।।३।। नेतिरूप हें सहज पद । त्यानें सृजिलें समाख्य ब्रह्म आनंदप्रद । त्यानें निर्मिले सत्यानृत विशद । तदनंतर उत्थान संयुक्त ।।४।। विप्रेशांनो ब्रह्माद्वय सृष्ट । ती दोन्ही परम नामयुक्त । त्यायोगें देहिमय देह प्रचुर असत । ब्रह्म त्यानें बिंदुनिर्मित ।।५।। तो बिंदु चतुर्देहमय असत । त्यांतून स्थूल सूक्ष्म सम नाद सृष्ट । विश्वरूप नानाभेदयुक्त । त्यापासून व्यष्टिरूप ।।६।। ऐसी हीं ब्रह्मरूपें उत्पन्न । अक्षम सर्वत: ज्ञानहीन । त्यांनी तप आचरिलें एकमन । नामहीन तत्त्वाचें ।।७।। बीजरूप सर्वांचा मंत्र जपून । निरंतर त्या अनामिका ध्याऊन । ऐसीं शंभर वर्षे जातां प्रसन्न । गजानन तैं जाहला ।।८।। त्यानें मंत्रमय स्वरूप दाखविलें । त्याच्या कृपेनें त्यांनीं तें पाहिलें । हृदयीं त्यांच्या स्थिरावलें । एकाक्षर मंत्र तेजयुक्त ।।९।। ज्ञानकर मंत्र तो पाहून । ब्रह्मे मनीं हर्षून । आदरें करिती नमन । संग्रह करिती मंत्राचा ।।१०।। मंत्राकार गणेशासी ध्याती । अत्यंत यत्नें विघ्नपा तोषविती । दिव्य वर्ष सहस्रानंतर होती । श्रीगजानन प्रसन्न ।।११।। आपुलें स्वरूप दाखवित । योगिध्येय जें उत्तम असत । नरकुंजर रूप त्यास पाहत । हृदयीं अत्यंत विस्मित झाले ।।१२।। त्या ब्रह्मांसी ढुंढी देत । सुनिर्मल ज्ञान तैं त्वरित । त्यायोगें गणराजाचें रूप ज्ञात । जाहले त्या ब्रह्मांसी ।।१३।। सगुण निर्गुणयुक्त योगमय परम । तें पाहून रूप मनोरम । ब्रह्में हृष्ट होऊन अभिराम । नित्य विघ्नेशासी ध्याती ।।१४।। जप ध्यान नित्य करिती । तेव्हां संतुष्ट प्रीत गणपती । शिवरूपधर जाती । पंचवक्त्र त्रिलोचन ।।१५।। मुंडमाला गळ्यांत । व्याघ्राचें हस्तीचें चर्म पांघरित । विभूतीचा लेप पुनीत । सर्वांगावरी विमल होत ।।१६।। शेषनागाचें विभूषण । वृषध्वज वृषारूढ महान । चंद्रगड त्रिशूलधर शोभन । अर्धांगी

गिरिजायुक्त तो ।।१७।। योगींद्र योगिवंदित । महेश ऐसा तेथ प्रकटत । ब्रह्में त्यास पाहून विस्मित । वस्तुत: तो गणेशचि ।।१८।। ब्रह्में त्याचा आदर करिती । गणेशकृपेनें जाणिलें चित्तीं । सकळ कौतुक ती पाहती । परस्परांसी सांगतीं ।।१९।। शिवाच्या हृदयीं बोध । तेथ सहज गणपाकृति सुबोध । वर्ण धूम्रायित विशद । योगें धूम्राक्षर नाम झालें ।।२०।। त्याचें बिंब मायायुत । पडलें जगांत ब्रह्मांत । त्यायोगें हा प्राज्ञ असत । वृषध्वज महान ।।२१।। बिंबबिंबी प्रभावाने ख्यात । धूम्रवर्ण ऐसें यास म्हणत । भेद नसे शास्त्रवादांत । नि:संशय तो वरद होईल ।।२२।। तदनंतर तीं ब्रह्में उठून वरती । गणपाची स्तुती करिती । हृदयांत स्थित त्या शिवास नमिती । विशेषें भावभक्तीनें ।।२३।। विधिपूर्वक शंभूस पूजून । आनंदें प्रणाम करून । आनंदमुख्यें ब्रह्में करिती स्तवन । अत्यंत आदरभावानें ।।२४।। धूम्रवर्णासी गणेशाकृतिधरासी । बिंबासी शंकरासी । शंभूसी अमेयशक्तीसी । पार्वतीपते तुजला नमन ।।२५।। वृषध्वजासी देवासी । सहजासी मायाश्रयासी । मायाचालकासी परात्म्यासी । महेश्वरा पूर्णा तुज नमन ।।२६।। हेरंबासी जटाजूट - धारकासी । निर्मोहासी सदाशिवासी । परेशासी त्रिशूलधरासी । स्वाधीना तुजला नमन असो ।।२७।। पंचवक्त्रधरासी । अनाथांच्या नाथासी । परब्रह्म स्वरूपासी । ब्रह्माधिपते तुजला नमन ।।२८।। गिरीशासी चिताभस्मांगधारकासी । मुंडमाळा धारकासी । सर्पभूषणासी नानाभेदयुक्तासी । नाना खेळकर्त्या तुज नमन ।।२९।। ज्याच्या वामभागीं असत्य त्यासी । दक्षिणांगीं सत्य तयासी । त्यांच्या अभेदें आनंदरूपासी । स्वस्वरूपा तुज नमन असो ।।३०।। महामायादी समरूपा वर्तत । देह तुझाची तो ख्यात । अर्धनारीरूपीं आत्मरूप ज्ञात । शंभो तूच नमन तुला ।।३१।। ऐशा ब्रह्मरूपी ब्रह्मास । सर्वांच्या नेति कर्त्यास । पाहून

धन्यता आम्हांस । महेशाना आज वाटे ।।३२।। तूंच धूम्रवर्ण अससी । भेद कांहीं न दिसे आम्हांसी । असमर्थ तुमच्या स्तुतीसी । प्रभो नमस्कार स्वीकारावा ।।३३।। शिव म्हणे ऐसें बोलून । महेशानातें आदरें नमून । ब्रह्मे जाहली पदलीन । तेव्हां शंकर त्यांस म्हणे ।।३४।। करुणानिधि आदि शंभु म्हणत । ब्रह्मांनो वर मागा सांप्रत । तुमच्या तपानें मीं तुष्ट । स्तोत्रानें तैसाचि भक्तीनें ।।३५।। जें हृदयांत ईप्सित । तें मागा संशय न धरावा येथ । ब्रह्में म्हणती आम्हांप्रत । उत्तम भक्ति देई नाथा ।।३६।। महेश्वरा विद्यारूपा स्वकार्यांत । स्मृति देई आम्हां सतत । आपापलें कार्य करतां बंधमुक्त । आम्हीं व्हावें ऐसें करी ।।३७।। सतत योगधारक व्हावें । बंधहीन जगतीं स्वभावें । ऐसें वरदान द्यावें । हीच आमुची प्रार्थना ।।३८।। श्रीशिव म्हणती तयांप्रत । जें जें इच्छिलें तें तें प्राप्त । होऊन व्हाल सुखयुक्त । दुर्लभ तुम्हां काय असे ।।३९।। आतां बंधहीन योग्याजवळीं खास । करावा तुम्ही योगाभ्यास । जो साधता तुम्हांस । बंधभय न कदा बाधेल ।।४०।। सर्वांचा नेति कर्ता मजला । जाणता चतुर्थकाला । चारांच्या संयोगें बुध जनाला । स्वस्वरूपाचें ज्ञान झालें ।।४१।। ज्यापासून स्वाधीन । रूप उपजलें पराधीन । त्रिधा कलांशें तो गजानन । ऐसें तुम्हीं जाणावें ।।४२।। स्वस्वरूपमय ढुंढी कीर्तित । जो असे मायायुक्त । चारांच्या चालकत्वें जगांत । संयोग अभेदें तो प्रभू ।।४३।। अयोगपंचहीन सतत । निवृत्तिवाचक ख्यात । तेथ ब्रह्मांचा जगतांचा न होत । योग परस्परांशीं ।।४४।। संयोग अयोग योगें ज्ञात । गणेश योगवाचक जगतांत । पूर्णशांतिप्रद ब्रह्मभूत । गजानन साक्षात ।।४५।। ग कार स्वस्वरूपाख्य । ण कार असे योगाख्य । त्यांचा स्वामी नरकुंजर रूपाख्य । गणेश थोर श्री देव ।।४६।। त्यास विशेषें भजाल । तरी शांति तुम्हां लाभेल । सतत बंधहीन व्हाल । अन्यथा

हें असंभव ।।४७।। जैसा धुरानें जो देश व्याप्त । तो मानवासी न दिसत। तैसा हा दिसून न दिसत । धूम्ररोधन म्हणोनि ।।४८।। चित्तमयी माया रत । पंचधा जी विविध वस्तूंत । त्या मायेनें जे युक्त । ते न पाहती त्या देवासी ।।४९।। वेद वर्णमय कथित । ते मायेनें धूम्रमय होत । म्हणून गणेशासी स्वशिष्याप्रत । धूम्रवर्ण ऐसें वर्णिती ते ।।५०।। पूर्णशांतिप्रद योग जाणून । धूम्रवर्णात्मक पावन । त्या योगें भजावा गजानन । ब्रह्मांनो तुम्हीं सर्वदा ।।५१।। जीं जीं कार्यें स्वभावस्थ उचित । तीं तीं करा समर्पित । धूम्रवर्णासी तरी बंधमुक्त । व्हाल तुम्हीं निःसंशय ।।५२।। ऐसें बोलून महादेव होत । तेथेंचि तैं अंतर्धान क्षणांत । ब्रह्में त्यांसी नमन करित । नंतर विविध जग तीं निर्मिती ।।५३।। यथोपदिष्ट योगानें भजत । गणेशासी आदरें ती सतत । योगयुक्त बह्में पुनीत । ऐसा हा शिवरूप गणेशावतार ।।५४।। धूम्रवर्णकलांश असत । शिवात्मक अवतार हा परम अद्भुत । सर्वसिद्धिप्रद सतत । वाचका श्रोत्या सर्वांसी ।।५५।। जो हा योग आराधित । त्यास ऐहिक भोग प्राप्त । अंती स्वयं स्वानंदपुरांत । जाईल तो हें निश्चित असे ।।५६।। ओमिति श्रीमदांत्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते शिवात्मकावतारचरितं नाम दशमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय दहांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । शिव सांगती विप्रांप्रत । एकदां मी कैलासीं स्थित । गिरिजेच्या सान्निध्यांत । गणेशासी भजत होतों ।।१।। तैसें मज भजतांना पाहत । नंदी तेव्हां मज म्हणत । शिवा तूं सर्वरूप प्रकीर्तित । सर्वस्वी सर्वांना फलदाता ।।२।। तूं कर्मांचा कर्मधारक ।

योग्यांचा योगनाथ पावक । योगसिद्धींचा तूं दायक । तुझ्याहून श्रेष्ठ कोण असे ।।३।। तरी तूं गजाननासी । कैसा हो भजत अससी । वेद शिवसुत ऐसें ज्यासी । वर्णिती त्यास कसे पूजिता ।।४।। तूं स्वामी तो तुमचा सुत । तरी स्वसुतास कैसें भजत । ईश हें तुझें नांव ख्यात । सर्वांचा स्वामी तूं सदाशिव ।।५।। तुझा ईश न ज्ञात । वेदांतही तूं एकच सर्वभावन उक्त । जनांस मोहविण्या भजत । बहुधा तुम्हीं गणनाथासी ।।६।। शैवरहस्य गुप्त ठेवावें । ऐसें वाटून सर्वभावें । पार्वतीसह तूं भक्तिभावें । हें पूजेचें नाटक करिशी ।।७।। तरी स्वामी ऐसें वृथा न करावें । गणेशभजन मोहभावें । शैवासी मोहद जें व्हावें । व्यभिचारप्रद देवा ।।८।। मुद्गल सांगती दक्षाप्रत । नंदीचें वाक्य ऐकून म्हणत । सदाशिव हर्षोत्फुल्लनयन धीरोदात्त । महापाशुपतासी त्या ।।९।। नंदी तूं माझा पक्षपाती । गणेशासी न जाणसी निश्चिती । मीं गणरूप ही वेदोक्ती । विचक्षणा आठवावी ।।१०।। गण तें समूहरूप अनंत । त्या महात्म्याचें वर्तत । मी ईशसमूहाचा गण असत । गणपतीचा प्रख्यात ।।११।। गणेश एकमेव सत्य विश्वांत । त्याचे अन्य सर्व गण ज्ञात । ब्रह्माकार विश्वाकार असत । ब्रह्मेशाचें त्या मानदा ।।१२।। विद्या नानाविध स्मृत । ज्ञानप्रकाशक त्या असत । त्या सर्वही उत्पन्न होत । विद्याधीश मीं असें ।।१३।। ऐसें वेदवादी सांगती । योगविद्येचा आश्रय स्वचित्तीं । घेऊन गणेश भावभक्ती । सत्यार्थें मीं प्रकट करीन ।।१४।। समाधिज जें परब्रह्म । तेंच पुत्र ऐसें अभिराम । ख्यात झालें गणेश म्हणून । माझें पुत्रत्व पावला ।१५।। विद्येने ज्ञानानें युक्त । विष्णु शंकर जे अमर असत । ते विद्याधिप न ज्ञात । माझे शिष्य यांत न संशय ।।१६।। त्यांनीं योगबलानें प्रकट केला । गणेश समाधिज सुत भला । तो त्यांचा तैसाचि योग्यांचा झाला । सुत ऐसें तूं जाणावें

।।१७।। मीं आधीं ब्रह्मसाक्षात्कार । गुरूविण अनुभविला थोर । विद्याबळानें विश्वंभर । म्हणून मुख्य गुरु मीं ।।१८।। म्हणून गणनायक शिवसुत । ऐसें वेद सांगतात । विष्णु आदि मुख्य सुरेश्वर न ख्यात । गणेशपिता म्हणोनी ।।१९।। म्हणोनी मीं त्या ब्रह्मेशास । योगरूपा ब्रह्मवंदितास । भजतों दास मीं स्वामीस । न मोहविण्या अन्यातें ।।२०।। शिवाचें ऐकून वचन । नंदिकेश्वर विस्मितमन । महादेवा सर्वज्ञा नमून । पुनरपि विनवी नम्रभावें ।।२१।। गणेश आमुचा कुलदेव । यांत संशय नसे सर्वथैव । विभो त्यांचे ज्ञान अभिनव । मंत्र विधि आदि मज सांगा ।।२२।। शिव तदनंतर सांगती । चित्त पंचविध असे जगतीं । बुद्धी परम ती म्हणतीं । सिद्धि नाना भ्रांतिकरी ।।२३।। ऐश्वर्यमयी ती हृदयांत । सदैव सिद्धिबुद्धि मध्यांत । गणेशाचें बिंब मायायुत । बिंबभाव त्यागें गणेशरूप ।।२४।। सरस चित्त त्यागून । योगिवंद्य तूं होशील पावन । एकाक्षरविधानें करुन । योगसाधनांनी भज त्यासी ।।२५।। ऐसें सांगून त्यास देत । एकाक्षर मंत्र अद्भूत । विधिपूर्वक तो स्वीकारित । वनांत जाऊन तप करी ।।२६।। निराहार राहून आराधित । द्विरदाननासी नंदी ध्यानयुक्त । समाधियोगें विशेषें युक्त । शंभर वर्षे ऐसीं गेलीं ।।२७।। तेव्हां तो योगींद्र झाला । गणेश वर देण्या प्रकटला । आश्रमांत पाहून गणनाथाला । हर्षभरित नंदिकेश्वर ।।२८।। उठून प्रणाम करित । भावभक्तीनें पूजित । स्तोत्र गाइलें भावयुक्त । आश्चर्य तेव्हां एक पाही ।।२९।। गणेशाच्या डावीकडे स्थित । पार्वतीस तैं पाहत । तें पाहून अति विस्मित । गणेशकृपेनें ज्ञान झालें ।।३०।। त्यायोगें गणेशाचें सर्व कार्यजात । जाहलें तयासी ज्ञात । तेव्हां तो नंदिकेश विचार करित । बाह्यरूपधर हा महादेव ।।३१।। गिरिजेचा पति ख्यात । पंचमुखादि चिन्हांनी युक्त । त्रिनेत्र नरदेहयुक्त । भिन्नभाव प्रदर्शक ।।३२।।

आनंदात्मरूपा पार्वती ख्यात । विष्णुरूपिणी ती असत । शिवदेवमयी उक्ती ज्ञात । तिचा आत्मा शिव असे ।।३३।। गजाकार स्वयं शंभु वर्तत । ऐक्ययोगपरायण सतत । अर्धांगीं प्रकृति असत । त्यायोगें अर्धनारीनटेश्वर तो ।।३४।। नरकुंजरयोगें प्राप्त । गणेशाचा आकार तयाप्रत । शिव तो ब्रह्ममय साक्षात । गिरिजेनें युक्त असे ।।३५।। योगमायामयी रम्या स्थित । गणेशांकावरी ती पुनीत । पार्वती पार्वतीनाथ विलसत । स्वयं गणेश त्या समयीं ।।३६।। तोच वरदानार्थ उपस्थित । शिवचित्तमय तो प्रख्यात । त्यास प्रणाम करुन स्तवित । रोमांचित कृतांजली ।।३७।। गणेशासी शांतिप्रदासी । शांतिरुपासी शांतिधरासी । नरांच्या हृदयस्थितासी । नागहृदयस्थिता नमन ।।३८।। हेरंबासी सिद्धिबुद्धिविहारासी । स्वानंदरुपासी चौरेशवाहनासी । पार्वतीपतीसी शिवचित्तगासी । लक्ष्मीपते तुज नमन ।।३९।। विष्णुचित्तस्थमूर्तीसी । संज्ञापतीसी भानुहृदयस्थितासी । आदिशक्तिपतीसी । शक्ति चित्तग मूर्तीसी नमन ।।४०।। सावित्रीपतीसी गायत्रीपतीसी । ब्रह्महृदय खेळकासी । ओंकार चित्तवासीसी । शचीपते तुज नमन ।।४१।। इंद्रचित्तग मूर्तीसी । स्वाहापतीसी परेशासी । अग्निहृदय स्थितासी । नररुपासी नमन तुला ।।४२।। भिन्नसौख्य प्रचारकासी । सर्वत्री भिन्नभावासी । निर्गुणासी कुंजराकार मूर्तीसी । निर्गुणस्थितासी नमन असो ।।४३।। सर्वत्र अभेदसौख्यासी । नरकुंजररुपासी । योगाकारासी योगपतीसीं । पूर्णयोगस्वरुपा नमन असो ।।४४।। धन्य मी कृतकृत्य प्रसन्न । पाहिला आज गजानन । ब्रह्मेशा किती करुं स्तवन । वरदा तुजला नमन असो ।।४५।। ऐसी स्तुती करुन । प्रेमभरें करी नमन । ह्यास भक्तवत्सल म्हणे वचन । नंदीशा वर माग महाभागा ।।४६।। तुझ्या तपानें मीं तुष्ट । पुरवीन तुझें सर्व इष्ट । तूं रचिलेलें स्तोत्र

अद्भुत । भुक्तिमुक्तिप्रद सर्वदा ।।४७।। पाठका श्रोत्यांस सर्व सिद्धिकर । होईल हें सर्वदा स्तोत्र । तेव्हां म्हणे नंदिकेश्वर । तुझी दृढ भक्ति देई मजला ।।४८।। मज गाणपत्य करी विनत । स्वामी सदैव तव भक्तिरत । विघ्नेशपरायणा तुझ्या भक्तांत । अग्रस्थान मिळो मजला ।।४९।। मी जेथ तप आचरिलें । तें स्थान क्षेत्र व्हावें भलें । गणाधीशानें तस्थाऽतु म्हटलें । अन्तर्धान पावे तदनंतर ।।५०।। तदनंतर ब्राह्मणहस्तें स्थापित । गणेश मूर्ति त्या क्षेत्रांत । नंदिकेश भक्तियुक्त । पूजन करी मनोभावें ।।५१।। पार्वतीगणप ऐसें नाम ठेविती । महर्षि त्याचें पूजन करिती । सर्वसिद्धिकर तें जगतीं । प्रख्यात जाहलें सर्वांसी ।।५२।। तदनंतर नंदी शंकराप्रत । जाऊन सांगे तो वृत्तांत । महायोगींद्र मुख्य वसत । शिवसान्निध्यांत आनंदे ।।५३।। हें अंबिकाविघ्नेश चरित । कथिलें तुज पुनीत । धूम्रवर्णात्मक हा गणेश असत । सर्व सिद्धिप्रद सर्वेश ।।५४।। जो हें चरित्र वाचील । अथवा श्रद्धेनें ऐकेल । त्यास भुक्ति मुक्ति लाभेल । अंती स्वानंदलोक लाभे ।।५५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते पार्वतीगणेशचरितं नामैकादशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय अकरांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । श्रीशिव कथा पुढची सांगती । त्रिपुर नाम दैत्य जगतीं । ब्रह्मदेवाच्या वरानें शक्ति । अद्‌भूत प्राप्त करता झाला ।।१।। तो महाबळी जिंकित । चराचर सारें त्वरित । यज्ञकर्मांचा लोप करित । वर्णसंकरज कर्में करवी ।।२।। तेव्हां उपोषणसंयुक्त । देव मज शिवास शरण येत । मीं अत्यंत क्रोधयुक्त । त्याच्यासह लढण्या गेलों ।।३।। माझें त्याच्यासवें होत । दारुण युद्ध त्या समयांत । देवदानव

त्वेषें लढत । रोमहर्षक तें युद्ध होतें ।।४।। संहारास्त्रें मी सर्वही सोडलीं । परी तीं महर्षींनो निष्फळ झालीं । म्हणोनि चित्तवृत्ति जाहली । खेदयुक्त त्या वेळीं ।।५।। क्षणांत अग्निशस्त्रें जित । त्या दैत्यराजाच्या हस्तें पराजित । मी कैलास सोडून पळत । गहन वनीं तैं गेलों ।।६।। निःश्वास सोडून चिंतायुक्त । हतोत्साह उद्यमरहित । विचार केला मनांत । हितावह एक त्या वेळीं ।।७।। हा दैत्य माझ्या हस्तें मरणार । यांत संशय न तिळमात्र । तरी माझें हें कृत्य थोर । निष्फळ कोणी कां केलें? ।।८।। मी ईश असून अनीश सांप्रत । ऐसा विचार जों करित । तोंच सूर्योदयासम तेज फाकत । देवमुनि नारद तेथ आले ।।९।। मजला प्रणाम करुन । उभे राहिले प्रसन्न । मीही त्यांचें केलें पूजन । विचारिलें त्यांना खेदानें ।।१०।। सर्व वृत्तांत ऐकून । मज म्हणे तो बुद्धिमान । त्रिपुरवधाचा उपाय तत्क्षण । म्हणे शिव तूं अहंकारी ।।११।। मोहसंयुक्त अहंकारयुक्त । विघ्नराजास विसरलास सांप्रत । त्याची पूजा न करितां गर्वयुक्त । सत्ताहीन झालासी ।।१२।। विघ्नें सत्तात्मक असत । त्यांचा स्वामी गणेश वर्तत । ढुंढीचें अर्चन विस्मृत । झालें म्हणून ईशत्व गेलें ।।१३।। आपुल्या देहींची सत्ता । मोहपरायण जे मानिती सर्वोच्च सर्वथा । गणेशासी न जाणती तत्त्वतां । सत्ताहीन होतात ते ।।१४।। जो कृपाकटाक्षें निर्मित । रक्षित अथवा संहारित । तृणापासून ब्रह्मांडादिक समस्त । लोकसंकुल तो गणेश ।।१५।। त्याच्या कृपेंवाचून । सदाशिवा तूं शक्तिहीन । गवताची काडीही शक्तिमान । तुझ्या पुढें सांप्रत ।।१६।। तरी दैत्यास कैसें जिंकशील । तुझें चित्त गर्वयुक्त न विमल । जरी त्यास शरण जाशील । तरी सत्ता सर्व तुज लाभे ।।१७।। त्रिपुर महादैत्यास । मारशील तूं निःशेष । मुद्गल सांगती दक्षास । ऐसें नारदें सांगितलें ।।१८।। तदनंतर महेशास नमून । महामुनि करीत गणेशगायन ।

गेले स्वेच्छापरायण । त्रिभुवनीं संचार करावया ।।१९।। शिवाने हृदयीं गणेश स्मरुन । केलें ब्रह्मनायकाचें चिंतन । दंडकारण्यांत जाऊन । वनैकदेशी तप केलें ।।२०।। ऐसी शंभर वर्षे जात । शिव होता तपश्चर्यारत । तैं गणनायक प्रकटत । मूषकावरी बैसोनी ।।२१।। दहा आयुधें करांत । त्यास पाहुन शंकर वंदित । पूजन करुन स्तवित । भक्तिभावें गणेशासी ।।२२।। गणेशा परेशा तुज नमन । धूम्रवर्णा ढुंढे अभिवादन । शिवात्मजा करतो वंदन । सर्वांचा तूं मातापिता ।।२३।। गणेशासी गुणसर्जकासी । संहर्त्यासी निर्मात्यासी । सर्वपालका सर्वदेवासी । हेरंबासी नमन असो ।।२४।। अनंत विभवासी अनंतोदरासी । अनंत माया प्रचालकासी । विघ्नेशासी ज्येष्ठराजासी । ज्येष्ठज्येष्ठासी नमन असो ।।२५।। सर्व पूज्यासी सर्वादिपूज्यासी । स्वानंदपतीसी मूषकध्वजासी । सिद्धिबुद्धिपतीसी । इक्षुसागरपतीसी नमन ।।२६।। मनोवाणी विहीनासी । मनोवाणीमयासी । योगेशासी महाविष्णुसुतासी । शेषपुत्रा तुज नमन ।।२७।। त्रैलोक्य क्षेत्रस्थासी । दंडकारण्यदेवासी । ब्रह्मेशा नमन तुजसी । गणेशा तुज अभिवादन ।।२८।। जेथ वेदादीही धरती मौन । तेथ किती करुं स्तवन । तुज गणाधीशा पाहून । धन्य मीं सर्वभावें झालों ।।२९।। तुझें झालें दर्शन । त्यायोगें धन्यरुप नयन । मस्तक धन्य तुज नमून । स्तवनानें मुखही माझें ।।३०।। तुझ्या पूजनें धन्य कर । दर्शनें धन्य सर्व शरीर । भक्ति देई दृढ वर । हाचि द्यावा गणनायका ।।३१।। त्यायोगें कृतकृत्य होईन । शांतियोगपरायण । त्रिपुरवधार्थ मज या क्षण । सामर्थ्य देई शाश्वत ।।३२।। महेशा तूं गणाधीश । सर्वांचा यथार्थे तूं ईश । सार्थक करी तूं परेश । तें ऐकून गुणेश म्हणे ।।३३।। त्या देववरिष्ठ भक्ताप्रत । म्हणे मीं ध्यानभावें तुष्ट । तुझें सर्वही इच्छित । सफल होईल

सदाशिवा ।।३४।। त्रिपुरनाशार्थ सांगत । तुज मीं एक उपाय सांप्रत । त्रिविधा परम माया असत । देहभोगपरायणा ।।३५।। आसुरी त्रिपुराख्या ती असत । नाना विषयांत लंपट । तिच्या जयास्तव त्वरित । तूं माझा आश्रय घेतलास ।।३६।। मीं चतुर्थ गणपाकृती । माझें रुप पुरुषवाचक जगती । माझें पौरुष बीजरुप घेऊन मजप्रती । विचक्षणा काय करी ।।३७।। त्रिगुणरुप माया सत्त्वरी । तूं टाक मजवरी । ऐसें सांगून गणेश दैत्यारी । पौरुष मंत्र त्यास देई ।।३८।। त्याची माया घेऊन । निर्मोह करी शिव पालन । तदनंतर गुणेश अन्तर्धान । ब्रह्मनायक झणीं पावले ।।३९।। शिव मंत्रप्रभावें मारित । त्रिपुरासुरासी तो त्वरित । सदा पौरुषभावें युक्त । जाहला मायेस जिंकून ।।४०।। मायेस स्वाधीन करित । ऐसा मंत्रप्रभाव अद्‌भुत । हें गणेशस्तोत्र जो ऐकत । शिवविरचित भक्तीनें ।।४१।। तो मोहहीन होत । सर्वभावें देवपरायण वर्तत । पुत्रपौत्र समायुक्त । धनधान्यानें समृद्ध होई ।।४२।। विविध भोग अनंत । भोगून अंती स्वानंद लोकीं जात । हें गुणेशमाहात्म्य जो ऐकत । अथवा वाचित नित्य नेमें ।।४३।। त्या नरास सर्व सिद्धि प्राप्त । पौरुषार्थप्रद हा सत्य वाटत । धूम्रवर्णात्मक अवतार जगांत । भुक्तिमुक्तिप्रद सर्वदा ।।४४।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खंडे धूम्रवर्णचरिते गुणेशावतारवर्णनं नाम द्वादशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय बारांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । श्रीशिव सांगती पावन कथा । बलीचा पुत्र बाणासुर होता । देत्य असून धार्मिकता । त्याच्या मनीं वसत होती ।।१।। तो बाणासुर शिवभक्त । सदा साधुगुणांनी युक्त । बाल्यापासून

अविरत भजत । शंभूस तो प्रतापवंत ।।२।। अन्य देवांस न जाणत । स्वधर्मपालनांत रत । शुक्र त्यास शिवमंत्र देत । पंचाक्षरयुक्त विधिपूर्वक ।।३।। त्यास तप करण्या सांगत । तोही उग्र तप आचरित । भजने शिवास भक्तियुक्त । सदा ध्याई स्वचित्तांत ।।४।। ऐसीं सहस्र वर्षे जात । तेव्हां मीं संतुष्ट होत । बाणास वर देण्या जात । करुणानिधि मीं संतुष्ट ।।५।। मुद्गल सांगती दक्षाप्रत । रौद्र स्तोत्रांनीं तो तोषवित । यथाविधि पूजन करित । बाणासुर तैं शंकराचें ।।६।। तेव्हां शंकर भगवान । होऊन मनीं प्रसन्न । माग म्हणती वरदान । असुराधिपा मीं देईन ।।७।। तेव्हां बाणासुर म्हणत । जरी तूं वर देण्या इच्छित । तरी दृढ भक्ति तुझी चित्तांत । माझ्या स्थिर करी दयाघना ।।८।। न अन्य देवपरायण । मज शैवोत्तम करी महान । सहस्रबाहू मज लाभून । सामर्थ्य अद्भूत लाभावें ।।९।। या समस्त चराचरांत । कोणी नसावा माझ्यासम बलवंत । मी अजिंक्य संग्रामांत । होईन सदा ऐसें करी ।।१०।। महादेव त्यास तो वर देत । पार्वती गणांच्या सान्निध्यांत । तद्नंतर स्वगृहीं परतत । प्रशंसित भक्तोत्तमातें ।।११।। तदनंतर बाणासुर जिंकित । विष्णुमुख्य देवांस त्वरित । देवांवरी राज्य करित । धर्मनिष्ठ स्वभावानें ।।१२।। स्वर्गांत देवांस स्थापित । पाताळांत असुरां राज्य देत । नागांस नरांसी पृथ्वीवरी ठेवित । धर्मनीती राज्य करी ।।१३।। वर्णाश्रमयुक्त सर्वांस पाळित । नित्य कैलासीं तो जात । शंकरप्रभूसी पूजित । सदाशिव संतुष्ट त्याच्यावरी ।।१४।। त्याच्या धर्मप्रभावानें । तैसेंच परम भक्तीनें । संतुष्ट होऊन प्रसन्नमनें । महादेव त्याच्या नगरीं जाती ।।१५।। तेथ पार्षदांसह वास करित । तेव्हां बाणासुर मनीं विचार करित । पंचायतनरूपें शंकर पूजित । यापुढें एकासची पूजीन ।।१६।। शंकराहून अन्य देव नसत । अन्य कोणा न मीं मानित । शंकरा पूजितां सर्व पूजित ।

होतें सर्व चराचर ।।१७।। परी सर्व शास्त्रें सांगती । प्रथम पूजावा गणपती । तो गजानन पूजावा सांप्रती । कैसें आतां करावें ।।१८।। गाणपत्य ब्राह्मण जे असती । ते गणेशपूजा प्रथम करिती । मी जरी प्रथम गाईन त्याची महती । तरी मीं एकनिष्ठ शिवभक्त कैसा ।।१९।। ऐसा विचार करुन । गणपतीस त्यागून । एकनिष्ठ मनें शंभूचेंच पूजन । एकदेवाचें तो आदरें करी ।।२०।। ऐसें एक वर्ष झालें । शोणित नगरीं शंकर राहिले । त्यासी पुजून भावबळें । नाचे मोदपर तो असुर ।।२१।। तेव्हां शिव झाला प्रसन्न । म्हणे असुरा माग वरदान । महापाशुपत तो महान । तें ऐकून बाण तोषला ।।२२।। बळिनंदन तो हर्षभरित । महादेवास प्रणाम करित । म्हणे योद्धा मजसदृश सांप्रत । द्यावा देवेशा लढण्यासी ।।२३।। माझ्या सहस्र भुजांचें वीर्य । सहन करिल ऐसा थोर । निर्माण करी तूं वीर । अति पराक्रमी देवेशा ।।२४।। तें ऐकून शंभु कुपित । शाप त्या असुरास देत । तुझ्या भुजांचा छेद त्वरित । होतां राज्यभ्रष्ट तूं होशील ।।२५।। असुराधमा वासुदेवासह । संग्राम तुझा होईल दुःसह । माझ्यापासून काय वर तुज मिळत । पराजित तूं होशील ।।२६।। तें ऐकून शोकसंतप्त । बाण त्यास प्रणाम करित । स्वगृहीं परतून शुक्राप्रत । निवेदिला सारा वृत्तान्त ।।२७।। शिव त्या असुरास सोडून । गेला कैलासीं क्रोधयुक्त मन । मनी त्या असुराधमा आठवून । संताप त्याचा होतसे ।।२८।। तिकडे शुक्र करी सांत्वन । बाणासुराचें करुणायुक्त मन । योगीश तो द्विजसत्तम पावन । म्हणे दैत्येंद्रा ऐक हित ।।२९।। गणेशासी त्यजून । तूं शंकराचें करिसी भजन। वेदविरुद्ध आचरण । करिसी यांत न संशय असे ।।३०।। ज्येष्ठराज गणेशास । वेद वर्णिती सविशेष । सर्वादिपूज्यत्व तयास । प्रकाशकारक शुभ असे ।।३१।। जैसें संध्यादिक कर्म । आवश्यक असतें नित्य

अभिराम । तैसेंचि गजानन पूजन परम । सर्व प्रथम गायिलें असे ।।३२।। एकनिष्ठपदांनी पूजन । करावें त्याचें नितनेम । गणेश्वरास त्यागून । एका शंभूस तूं भजसी ।।३३।। तो गणनाथ कुपित । तुझा बुद्धिभेद करित । तो सिद्धिबुद्धिपति साक्षात् । गणेश ब्रह्मनायक ।।३४।। त्यास सोडून तुजला प्राप्त । शांभवी सिद्धि कैसी जगांत । शिवाच्या हृदयांत। सदैव तोच राहतसे ।।३५।। त्याच्या इच्छेनें शिवादिदेव । आचरिती सदैव । तैसें तूही आचरीं सुदैव । तरीच तुजला लाभेल ।।३६।। त्यानेंच तुज शिवहीन । केलें मनीं संतापून । शंकराचा कोप होऊन । शापयुक्त झालास तूं ।।३७।। तरी आतां त्या देवा शरण। जाई गणेशा एकमन। ब्रह्मनायकासी जो विघ्नविहीन । करील तुज नि:संशय ।।३८।। गण समूहरुप असत । समूह ब्रह्मवाचक वर्तत । बाह्यांतर एकभावें होत । समूह ऐसें जाणावें ।।३९।। ऐसा गणराजाचा गण एक । शिव असे ख्यात ईश्वर नि:शंक । समूहाख्य जो पावक। विचार करी महामते ।।४०।। अथवा शिवसंज्ञ तोच असत । सहजांची परागति जगांत । गणरुप ईश्वराच्या समूहांत । सहज शिव हा जाणावा ।।४१।। ऐशाचि रीती विष्णु आदि । देव सर्वही गण त्याचे तत्त्वादि। वेदउपनिषदें विशदी । अथर्वणांत सांगती ।।४२।। ऐसें सांगून शुक्र परतत । आपुल्या गृहासी ज्ञानवंत । बाणासुर तो खेदयुक्त । विचार करी स्वमानसीं ।।४३।। तदनंतर त्या गणेशाचें ज्ञान । महा अद्‌भुत मनीं उपजून । चतुर्थी दिनीं करी पूजन । दैत्येश तो गजाननाचे ।।४४।। ध्याननिष्ठ तो जप करीत । गणेशमंत्राचा भक्तियुक्त । गणांना त्वा हा मंत्र पुनीत । प्रिय असे गजाननासी ।।४५।। बाण क्षमायाचना करीत। अथर्व उपनिषदें स्तवित । तदनंतर प्रसन्न होत । भक्तवत्सल गजानन ।।४६।। बाण उपवास करित । द्विरदानन त्याच्या पुढें प्रकटत । एक

वर्ष परिक्षा घेत । अन्तीं प्रसन्न जाहला ।।४७।। मूषकावरी बैसोन । आला तेव्हां गजानन । त्यास पाहुन हर्षयुक्त मन । प्रणाम करी बाणासुर ।।४८।। भक्तिलोलुप पूजा करित । कृतांजलि स्तुति करित । बाणासुर परम धर्मात्मा स्तवित। भक्तिनम्र मान वाकवून ।।४९।। विघ्नेशासी परेशासी । भक्तविघ्नविदारकासी। अभक्तां विघ्नकर्त्यासी । विघ्नविघ्नासी नमन असो ।।५०।। विनायकासी देवेशासी । दैत्येशनायकासी निरंकुशासी। ज्येष्ठराजासी ज्येष्ठासी । ज्येष्ठपूज्यासी सतत नमन ।।५१।। सर्वपूज्यादि पूज्यासी । परेशासी लंबोदरासी । सर्वांच्या मातापित्यासी । हेरंबासी नमन असो ।।५२।। आदिमध्यान्तहीनासी । शूर्पकर्णासी शूरासी। मोहांधकविदारकासी । ब्रह्मेशा तुज नमन असो ।।५३।। सुशांतासी शांतिदात्यासी । एकदंतासी देवासी । स्वानंदनिवासकासी । अमेयासी नमन असो ।।५४।। अप्रतर्क्यासी मायिकासी । मायामायिकरूपासी। मायामायिकवर्जितासी । अनाथांच्या नाथासी नमन ।।५५।। सिद्धिबुद्धिपतीसी । सदा योगपरायणासी । योगींद्रासी सुयोगासी । कुलदेवा तुज नमन असो ।।५६।। तुझ्या अधीन हें समस्त । बुद्धिचालकरूपा तुजप्रत । सिद्धिसंमोहित हें जगत । सिद्धिदात्या तुजला नमन असो ।।५७।। शिवादिक समर्थ होत । तुझी कृपा जेव्हां होत । ते जरी अहंकारयुक्त। अधिकार भ्रष्ट तरी होती ।।५८।। मीं अज्ञानानें सोडिलें। शिवकामनेनें तुज अवमानिलें । तेव्हा मज शापून गेले । शंभु देव क्रोधपरायण ।।५९।। म्हणोनि रक्षी विघ्नेशा। नाथविवर्जित मजला परेशा । अपराधांची क्षमा परेशा । करून निरंतर राख मजला ।।६०।। ऐसी स्तुती करून। गणेशास करी अभिवादन। बाणासुर दुःखार्त करी रुदन । पाय पकडून महात्म्याचे ।।६१।। त्यास वरती उठवून । गणाधीश म्हणे वचन । स्वमायामोहिता शरण । दीनास त्या देऊनियां ।।६२।। तूं केलेलें हें

स्तोत्र । व्यतिक्रमविदारक पवित्र । सर्व सिद्धिप्रद सर्वत्र । होईल महादैत्या सदा ।।६३।। या स्तोत्रानें प्रसन्न । भुक्तिमुक्ति तुज देईन । जरी मज विसरशील उन्मत्तमन । तरी मीं क्रोधयुक्त होईन ।।६४।। शिवहीन तुज करून । नरकांत अन्तीं टाकीन । परी आतां मज शरण। आलास आता काय करूं ।।६५।। शुक्रशिष्या तूं महासुर । माझ्या पायाचा किंकर । शरणागत पश्चात्तापपर । म्हणोनि अभय तुज देतो ।।६६।। परी शिवाचा शाप जगांत । मिथ्या कधींही न होणार निश्चित । तथापि उपाय सौख्ययुक्त । सांगतों तुज ऐक बाणा ।।६७।। वासुदेवाशी तूं लढशील । तुझे हजार बाहू तुटतील । राज्यही नष्ट होईल । पुनरपि तें मिळेल परी ।।६८।। ऐसें बोलून थांबत । गणेश तेव्हां दैत्य नमित। गणनायकास म्हणत । नाथा मागणें एक असे ।।६९।। तुझें विस्मरण मजप्रत । कधीही न होवो जगांत । तुझ्यासहित शिवास भक्तियुत । भजीन मी भक्तीनें ।।७०।। गणेशा ज्ञान शाश्वत । देई विघ्नेशा मजप्रत। अन्य कांहीं मी न वांछित । तुझ्या पादपद्मांची सेवा ।।७१।। श्रीगणेश म्हणे तयासी । गाणेश ज्ञान लाभेल तुजसी । या जडदेहानें शैव गणपदासी । पावशील तूं बाणासुरा ।।७२।। महाकाल नावें तूं विख्यात। होशील सर्व भूपाळांत । शिवपद नष्ट होतां स्वानंदांत । विलीन तूं होशील ।।७३।। ऐसें सांगून अन्तर्धान । गणाधीश झाले तत्क्षण । बाणासुर हर्षभरित मन । गणेशभजनीं लीन झाला ।।७४।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे अष्टमे खण्डे धूम्रवर्णचरिते बाणासुरवरप्रदानं नाम त्रयोदशोऽध्यायः समाप्तः श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय तेरांवा संपूर्ण)